# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### औढा नागनाथ (जि.हिंगोली) येथील ग्रामीण रुग्णालयातील विविध पदे रिक्त असल्याबाबत

**(१) २२२११ (१९-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औढा नागनाथ (जि.हिंगोली) येथील ग्रामीण रुग्णालयातील आरोग्य सेवा पुरविणारे वैद्यकीय अधिकारी, परिचारिका व इतर कर्मचारी यांची अनेक पदे रिक्त असल्यामुळे रुग्णांची गैरसोय होत असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२४-०९-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

ग्रामीण रुग्णालय औंढा नागनाथ जि.हिंगोली येथे गट-अ ते गट-ड संवर्गाची एकूण २८ पदे मंजूर असून माहे मे, २०१६ मध्ये त्यापैकी १४ पदे भरलेली व १४ पदे रिक्त होती. गट-ड संवर्गाच्या रिक्त पदांच्या जागी

रोजंदारी तत्वावर सेवा घेण्यात येतात. गट-अ ते गट-क संवर्गाच्या रिक्त पदांच्या जागी पर्यायी व्यवस्था करण्यात आली आहे व रुग्णांची गैरसोय टाळण्यात आली आहे.

(२) व (३) वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे ६६००/-) संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. तसेच दि.२७/१२/२०१८ रोजी वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गातील रिक्त पदे नियमितरित्या भरण्यासाठी जाहिरात प्रसिध्द करण्यात आली असून पुढील कार्यवाही सुरु आहे. गट-क व गट-ड संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही क्षेत्रियस्तरावर करण्यात येत आहे.

---

## राज्यातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्याबाबत

**(२) २५५८९ (३०-१२-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शेतकऱ्यांच्या वाढत्या आत्महत्या रोखण्यासाठी शासनाने शेतकऱ्यांचे समुपदेशन करण्याचा निर्णय घेतला असून त्यासाठीच्या कृती आराखड्यावर साडेसात कोटी रुपये खर्च केले जाणारा आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मराठवाड्यातील ६ आणि विदर्भातील ३ अशा एकूण ९ जिल्ह्यात विशेष समुपदेशन कक्ष स्थापन करण्यात येणार असून यात औरंगाबाद, जालना, हिंगोली, लातुर, बीड, नांदेड, अकोला, वाशिम आणि यवतमाळ या जिल्ह्याचा त्यात समावेश आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, सदर समुपदेशनाचे काम कोणत्या प्रकारचे आहे, सदर समुपदेशनात वरील ९ जिल्ह्यात एकूण किती कामगार कमी करीत आहेत,

(४) असल्यास, राज्यातील इतरही जिल्ह्यात सदर जिल्ह्यात सदर समुपदेशनाचे काम शासन सुरु करणार आहे काय व ते साधारण किती दिवसात,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०९-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) हे अंशत: खरे आहे.

प्रेरणा प्रकल्प-शेतकरी समुपदेशन व आरोग्य सेवा कार्यक्रम ऑक्टोबर, २०१५ पासून राज्यातील औरंगाबाद, बीड, जालना, हिंगोली, नांदेड, लातूर, उस्मानाबाद, परभणी, अकोला, अमरावती, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ व वर्धा या १४ आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांमध्ये सुरु करण्यात आला आहे.

(३) सदर कार्यक्रमांतर्गत राज्यातील ९ जिल्ह्यात ४७ अधिकारी/कर्मचारी व उर्वरीत पाच जिल्ह्यांमध्ये ३२ अधिकारी व कर्मचारी काम करतात. तसेच १०४ या टोल फ्री हेल्पलाईनच्या माध्यमातून नैराश्यग्रस्त रुग्णांचे समुपदेशन करण्यात येते.

(४) राज्यातील ३४ जिल्ह्यांमध्ये जिल्हा मानसिक आरोग्य कार्यक्रम सुरु करण्यात आलेला असून त्या अंतर्गत मानसिक रुग्णांना बाह्यरुग्ण व आंतररुग्ण सेवा देण्यात येतात.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आर्णी (जि.यवतमाळ) तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्र व आयुर्वेद रुग्णालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३) २८४५४ (१५-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.रामराव वडकुते, श्री.अनिल भोसले, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्णी तालुक्यात चार प्राथमिक आरोग्य केंद्र व दोन आयुर्वेद रुग्णालये असून तेथे वैद्यकीय अधिकाऱ्यांची मंजूर पदे रिक्त असल्याने रुग्णांना पूर्ण क्षमतेने आरोग्य सेवा मिळत नसल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार तालुक्यात प्राथमिक आरोग्य केंद्र व आयुर्वेद रुग्णालयात आरोग्य अधिकाऱ्यांची पदे भरुन रुग्णांना पूर्ण क्षमतेने आरोग्य सेवा देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२४-०९-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

प्राथमिक आरोग्य केंद्रांना वैद्यकीय अधिकारी, गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गाची प्रत्येकी दोन पदे याप्रमाणे एकूण ८ पदे मंजूर असून ७ पदे भरलेली व १ पद रिक्त आहे. तसेच दोन आयुर्वेदिक दवाखान्यांना वैद्यकीय अधिकारी, गट-ब संवर्गाचे प्रत्येकी १ पद याप्रमाणे एकूण २ पदे मंजूर असून दोन्ही पदे भरलेली आहेत.

माहे डिसेंबर, २०१६ दरम्यान आर्णी तालुक्यातील उक्त आयुर्वेदिक दवाखान्यांमधील वैद्यकीय अधिकारी पदे भरलेली होती व प्रा.आ.कें. लोणी व प्रा.आ.कें. सावळी सदोबा येथे वैद्यकीय अधिकाऱ्याचे प्रत्येकी एक पद रिक्त असल्यामुळे त्याठिकाणी यवतमाळ जिल्ह्यामधील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने रुग्णांना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यात येत होती.
(२) शासन दिनांक ०२/०३/२०१५ व दिनांक २१/०४/२०१५ अन्वये वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या रिक्त पदावर कंत्राटी वैद्यकीय अधिकारी यांच्या नियुक्तीस परवानगी देण्यात आली असून त्यानुसार पदभरतीबाबत कार्यवाही सुरु आहे.

तसेच सद्य:स्थितीत महाराष्ट्र आरोग्य व वैद्यकीय सेवा गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गातील रिक्त पदे नियमितरित्या भरण्याबाबत दि.२७/१२/२०१८ रोजी ८७७ पदांची जाहिरात दिली असून पुढील कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोंड-उमरे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील ग्रामीण रुग्णालयात सोई-सुविधा पुरविण्याबाबत

**(४) २९५९२ (१५-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोंड-उमरे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथे ग्रामीण रुग्णालय सुरु होऊन १० वर्षाहून अधिक कालावधी होऊनही सदर रुग्णालयात सोई-सुविधा उपलब्ध नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रुग्णालयात मूलभूत सुविधा त्वरीत पुरविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) कोंड-उमरे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथे ग्रामीण रुग्णालय कार्यरत नसून प्राथमिक आरोग्य केंद्र २००५ पासून कार्यरत आहे. या प्राथमिक आरोग्य केंद्रात अनुज्ञेय असलेल्या वैद्दकीय सुविधा पुरविल्या जातात.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात “गो अभयारण्ये” उभारण्याच्या प्रस्तावाबाबत

**(५) ३२४४१ (०७-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गायींच्या रक्षणाकरीता “गो अभयारण्ये” उभारण्याचा निर्णय केंद्र शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात व्याघ्र प्रकल्पाच्या धर्तीवर गायींच्या रक्षणाकरीता ‘गो अभयारण्ये’ उभारण्याच्या प्रस्तावाबाबत शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१२-०६-२०१९) :** (१) व (२) राज्यात गायींच्या रक्षणाकरीता गो अभयारण्ये उभारण्याचा कोणताही प्रस्ताव विचाराधीन नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अतिमहत्त्वाच्या व्यक्तिंना पोलीस संरक्षण देण्यात येत असल्याबाबत

**(६) ३६६९६ (०३-०५-२०१३). श्री.विक्रम काळे, श्री.सतीश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील राजकीय नेतेमंडळी (मंत्रीवगळून) अतिमहत्वाच्या किती व्यक्तिंना माहे जानेवारी, २०१३ पर्यंत पोलीस संरक्षण दिले आहे,
(२) तसेच या व्यक्तिंना पुरविल्या जाणाऱ्या पोलीस संरक्षणासाठी त्यांच्याकडून दरवर्षी मिळणाऱ्या शुल्काची रक्कम किती आहे व सदर अतिमहत्वाच्या व्यक्तिंकडून महसूल मिळत नसल्यास, त्यांना संरक्षण पुरविण्याची कारणे काय आहेत,
(३) माहे जानेवारी, २०१३ अखेर किती व्यक्तिंची सुरक्षा काढून घेण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे तसेच संरक्षणाची रक्कम वसूल करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०९-२०१९) :** (१) राज्यातील राजकीय नेतेमंडळी (मंत्रीवगळून) अतिमहत्वाच्या १०० व्यक्तिंना माहे जानेवारी, २०१३ पर्यंत पोलीस संरक्षण देण्यात आले आहे.
(२) केंद्रिय गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी जारी केलेल्या यलोबुक मधील निकषान्वये राजकीय व प्रशासनिक कार्याशी निगडीत व्यक्तिंच्या जीवीतास असलेला संभाव्य धोका विचारात घेऊन शासन आदेशान्वये वरील प्रमाणे वर्गीकृत संरक्षण प्रदान करण्यात आले होते. वर्गीकृत संरक्षणाकरीता संरक्षण शुल्क आकारण्यात येत नाही.
(३) माहे जानेवारी, २०१३ अखेर २० व्यक्तिंची सुरक्षा काढून घेण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. वर्गीकृत संरक्षणकरीता संरक्षण शुल्क आकारण्यात येत नाही.

---

## जयसागर (ता.जव्हार, जि.पालघर) धरणाच्या पाणलोट क्षेत्रातील वाढते अतिक्रमण निष्कासित करण्याबाबत

**(७) ३७०९८ (०४-०१-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जयसागर (ता.जव्हार, जि.पालघर) धरणालगत पाणलोट क्षेत्रात मोठ्या प्रमाणात अतिक्रमण होत असल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून उक्त धरणाच्या पाणलोट क्षेत्रातील वाढते अतिक्रमण निष्कासित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०८-२०१९) :** (१) अशा आशयाची तक्रार नगरपरिषद प्रशासनास प्राप्त झाली होती, हे खरे आहे.

(२) प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने आवश्यक त्या कार्यवाही करण्याच्या सूचना जिल्हाधिकारी, पालघर यांना देण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हजारमाची (ता.कराड, जि.सातारा) या गावातील ग्रामपंचायतीमध्ये कामे विलंबाने झाल्याबाबत

**(८) ४१२१३ (०४-०४-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हजारमाची (ता.कराड, जि.सातारा) या गावाचे रहिवाशी साबीर इब्राहीम मुल्ला यांनी दिनांक २९ सप्टेंबर, २०१६ रोजी ग्रामपंचायत हजारमाची यांना मालमत्ता क्र. २२ व २२/१ मध्ये मालक सदरी नोंद होणे करीता अर्ज दाखल केला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अर्ज नोंद ही ग्रामपंचायत अधिनियम व लोकसेवा कायद्यानूसार वेळेत होणे आवश्यक असताना ग्रामसेवक नामदेव चींचकर, विस्तार अधिकारी संजय सोनावणे, गटविकास अधिकारी (बी.डी.ओ.) अविनाश फडतरे यांनी सदर अर्ज वेळेत निकाली काढणे आवश्यक होते, परंतु दिनांक २९/९/२०१६ ते १०/२/२०१८ एवढा सुमारे ५०० दिवसाचा विलंब लावण्यात आला, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने जबाबदार असलेले ग्रामसेवक, विस्तार अधिकारी व गटविकास अधिकारी यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१५-०६-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम १९५८ व महाराष्ट्र लोकसेवा हक्क २०१५, ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र.आरटीएस/२०१५/प्र.क्र-३२/पंरा-५, दिनांक १४ जुलै, २०१५ च्या शासन निर्णयाप्रमाणे लोकसेवा हक्क कायदयामध्ये ग्रामविकास विभागांतर्गत ज्या सेवा पुरविणेच्या आहेत, त्या मध्ये ग्रामपंचायती मध्ये येणाऱ्या नमुना नं. ८ नोंदीबाबतच्या सेवा पुरविणे बाबतचा समावेश नाही.

श्री.साबीर इब्राहीम मुल्ला यांच्या दिनांक २९/०९/२०१६ च्या अर्जावर ग्रामपंचायतीने अर्ज प्राप्त झाल्यापासून २४ दिवसाचे आत म्हणजे दिनांक २२/१०/२०१६ रोजी श्री.साबीर इब्राहिम मुल्ला व इतर संबंधितांना मूळ दस्ताऐवज व लेखी म्हणणे सादर करणेबाबत नोटीस दिली. सदर नोटीशीला श्री.साबीर इब्राहीम मुल्ला व इतर यांनी कोणतेही उत्तर दिले नाही. ग्रामपंचायतीने दिलेल्या नोटीशीला खुलासा तक्रारदार यांचे चुलते श्री.बालेखान कासम मुल्ला व इतर यांनी मिळकत नं.२२ ला आमची मालक सदरी असणारी नांवे कमी करु नयेत, असा तक्रार अर्ज दिनांक १७/११/२०१६ रोजी दिला.

या प्रकरणी गट विकास अधिकारी, पंचायत समिती, कराड यांनी दिनांक ०७/०३/२०१७ रोजी तसेच दिनांक १७/११/२०१७ रोजी सविस्तर

मार्गदर्शन करुन ७/१२ व इंडेक्स प्रमाणे मासिक सभेत निर्णय घेणेबाबत कळविले. तद्नुसार ७/१२ व खरेदी दस्त पाहून श्री.साबीर इब्राहीम मुल्ला यांची मालक सदरी नोंद होणेस हरकत नाही असे दिसून येत असले तरी त्यांचे आजोबा कासम लालू मुल्ला (मयत) यांनी सन १९७८ ला केलेले खरेदीपत्र, त्याचे त्या वेळचे बाजार मुल्य, त्यांना वारस म्हणून असलेली ४ मुले, सध्या नमुना नं. ८ ग्रामपंचायत सदरी असलेल्या नोंदी व जागेतील भोगवटा याची गुंतागुत पाहता सदर नोंदीबाबत श्री.साबीर इब्राहीम मुल्ला यांनी योग्य त्या प्राधिकरणाकडे दाद मागणेबाबत ग्रामपंचायत हजारमाची यांनी पंचायत समिती कराड यांनी दिलेल्या मार्गदर्शनाचे पत्र ग्रामपंचायत मासिक सभा दिनांक ३०/१२/२०१७ ठराव नं.११९/२ अन्वये तक्रारदार श्री.साबीर मुल्ला यांना स्पीड पोस्टाव्दारे पाठविले आहे.

ग्रामपंचायतीने वेळोवेळी मासिक सभा ठरावाव्दारे उपलब्ध पुराव्यानुसार निर्णय घेतला असून या प्रकरणामध्ये विलंब झाला नाही.

दिनांक २३/६/१९७८ चे दस्तामध्ये मिळकतीचे वर्णन आहे. परंतु सर्व्हे नं.चा व ग्रामपंचायत मिळकत नंबरचा उल्लेख दस्तामध्ये नाही. तसेच श्री.साबीर मुल्ला यांनी केलेला दिनांक १४/१२/२०१५ रोजीच्या दस्तामध्ये फक्त खुल्या जागेचाच उल्लेख केला आहे. तथापि, प्रत्यक्ष स्थळ पाहणी केली असता, त्या ठिकाणी खुली जागा नसून प्रत्यक्षात ग्रामपंचायत मिळकत २२ व २२/१ मध्ये घरे, इमारती व इतर बांधकामे आहेत. त्यामधील इमारत बांधकामाचा उल्लेख खरेदी दस्तामध्ये नसतानाही अर्जदार यांने सर्व्हे नं. १३/३८ मध्ये ग्रामपंचायत मिळकत नं. २२ व २२/१ चा उल्लेख करून मिळकती असलेबाबत दिनांक २९/९/२०१६ रोजीच्या अर्जामध्ये मान्य केलेले आहे. अशा प्रकारची गुंतागुत असलेने त्यांच्या मालकी हक्काचे संबंधित तक्रारदार व गैरतक्रारदार यांनी अधिकार अभिलेखाबाबतची कागदपत्रे ग्रामपंचायतीस सादर केलेनंतर नोंदीबाबत कार्यवाही करणेत येईल.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील ऑनलाईन सेवक संच निश्चितीबाबत

**(९) ४२१४३ (०१-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये कित्येक वर्षापासून प्राथमिक व माध्यमिक शाळांमध्ये सेवकसंच ऑनलाईन पध्दतीने देताना अनेक त्रुटी आल्या असून या त्रुटी दुरुस्त न करता पुढील शैक्षणिक वर्षाचे सेवक संच दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर सेवक संचातील त्रुटीबाबत रायगड, ठाणे, पालघर, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यातील त्रुटी दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (२६-०५-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) ज्या शाळांना सेवक संचामध्ये दुरुस्ती आहे अशा शाळांच्या सेवक संचामध्ये दुरुस्ती करण्यासाठी वेळोवेळी शिबीरांचे आयोजन करुन सेवक संच दुरुस्त करुन देण्यात आलेले आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पडेगांव (ता.जि.औरंगाबाद) येथील जिल्हा परिषदेच्या शुभम मराठी शाळेतील सहशिक्षिकेला थकीत वेतन देण्याबाबत

**(१०) ४२५६६ (०२-०८-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पडेगांव (ता.जि.औरंगाबाद) येथील जिल्हा परिषदेच्या शुभम मराठी शाळेतील सहशिक्षिका श्रीमती मनिषा श्रीराम खरात यांना दिनांक १४ जून, २०११ ते जुलै, २०१५ पर्यंत थकीत वेतन मिळण्याबाबत मुख्याध्यापक यांच्याकडे मागणी करण्यात येत असूनही मुख्याध्यापक थकीत वेतनाची देयके जिल्हा परिषदेला सादर करीत नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने सहशिक्षिका श्रीमती खरात यांना त्यांचे थकीत वेतन अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (२९-०८-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.

श्रीमती मनिषा श्रीराम खरात या दिनांक १४ जून, २०११ ते जुलै, २०१५ या कालावधीमध्ये शाळेमध्ये अनुपस्थित असल्याने, उपरोक्त कालावधीतील त्यांचे वेतन देयक मुख्याध्यापक, शुभम प्राथमिक शाळा, पडेगांव, ता.जि.औरंगाबाद यांनी सादर केलेले नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्याच्या ग्रामीण भागात विशेषतज्ञांअभावी प्रसूती दरम्यान मातामृत्यू होत असल्याबाबत

**(११) ४३५१९ (०२-०८-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण भागात विशेषतज्ञांअभावी प्रसूती दरम्यान होणारे मातामृत्यू रोखण्यासाठी आरोग्य विभागामार्फत खाजगी डॉक्टरांची मदत घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या निर्णयाचे स्वरुप काय आहे व राज्यात या निर्णयाची अंमलबजावणी केली आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील जिल्हानिहाय माहे जून, २०१८ अखेर किती खाजगी डॉक्टरांची नेमणूक केली व किती डॉक्टरांची नेमणूक करण्यात येणार आहे ?

**श्री.एकनाथ शिंदे (२४-०९-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) प्रथम सेवा संदर्भ केंद्रांमध्ये सिझेरियन प्रसूती तसेच नवजात बालकाची काळजी तसेच दैनंदिन बाहय रग्ण विभागात प्रसूतीपूर्व तपासणी, विशेष जोखमीच्या मातांची तपासणी पाठपुरावा, सोनोग्राफी तपासणी, बालरुग्णांची तपासणी व आकस्मिक रुग्ण तपासणी या सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत निर्गमित केलेल्या आदेशान्वये स्त्रीरोग तज्ञ, भूलतज्ञ व बालरोग तज्ञांच्या कंत्राटी पध्दतीने नेमणूका ग्रामीण व उपजिल्हा रुग्णालये येथे करण्यात आलेल्या आहेत. या नेमणूका कंत्राटी पध्दतीने नियमित स्वरुपात किंवा ऑनकॉल बेसीसवर नेमणूका करण्यात येत आहेत व त्यांना मानधन व कामगिरीवर आधारित मोबदला दिला जातो.

(३) राज्यात माहे जून, २०१८ पर्यंत १४३ स्त्रीरोग तज्ञ, ६९ बालरोग तज्ञ व १५४ भूलतज्ञांच्या कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यात आलेल्या आहेत. तसेच आवश्यकतेनुसार कंत्राटी पध्दतीने पदभरती करण्यात येत आहे. जिल्हानिहाय माहे जून, २०१८ अखेर नेमणुक केलेल्या विशेष तज्ञांच्या पद भरतीचा तक्ता खालीलप्रमाणे :-

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **कंत्राटी तत्वावर झालेली विशेषतज्ञांची पदभरती** | | |
|---|---|---|---|---|
| | | **स्त्रीरोग तज्ञ** | **बालरोग तज्ञ** | **भूलतज्ञ** |
| १ | पालघर | ४ | २ | २ |
| २ | रायगड | ४ | ० | ६ |
| ३ | नाशिक | ५ | ३ | ४ |
| ४ | धुळे | ३ | ० | २ |
| ५ | जळगाव | ८ | ४ | ७ |
| ६ | अहमदनगर | २ | ५ | ८ |
| ७ | पुणे | ३५ | १५ | २७ |
| ८ | सोलापूर | ५ | ५ | ५ |
| ९ | सातारा | १३ | ५ | २० |
| १० | कोल्हापूर | १ | ४ | १० |
| ११ | सांगली | १ | १ | २ |
| १२ | औरंगाबाद | २ | १ | ० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ | परभणी | ० | ० | ३ |
| १४ | हिंगोली | ४ | २ | १ |
| १५ | लातूर | ५ | ० | ३ |
| १६ | उस्मानाबाद | ७ | ० | ४ |
| १७ | बीड | ० | ० | ७ |
| १८ | अकोला | ५ | २ | २ |
| १९ | वाशिम | २ | ० | १ |
| २० | अमरावती | ४ | ७ | ७ |
| २१ | यवतमाळ | १२ | ४ | ८ |
| २२ | बुलढाणा | ४ | ४ | २ |
| २३ | नागपूर | १ | ० | २ |
| २४ | वर्धा | १ | १ | २ |
| २५ | चंद्रपूर | १३ | ४ | १५ |
| २६ | गडचिरोली | २ | ० | ४ |
| **एकूण** | | **१४३** | **६९** | **१५४** |

---

## पालघर जिल्ह्यातील शासकीय रुग्णालयांबाबत

**(१२) ४५१३३ (०५-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्ह्यात शासनाने चालविलेली कोणती रुग्णालये आहेत,

(२) असल्यास, सदर रुग्णालयात औषधे, योग्य आहाराची सोय, स्वच्छता ठेवण्यात येत नाही अशा तक्रारी शासनाकडे प्राप्त झाल्या आहेत, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०९-२०१९) :** (१) पालघर जिल्ह्यात सद्यस्थितीत जव्हार व डहाणू येथे १०० खाटांचे आणि कासा येथे ५० खाटांचे अशी तीन उपजिल्हा तसेच अनुक्रमे तलासरी, पालघर, वाणगांव, बोईसर, वाडा, विक्रमगड, मनोर, मोखाडा व विरार येथे ९ ग्रामीण रुग्णालये कार्यन्वित आहेत.

(२) व (३) सर्व रुग्णालयात पुरेशा प्रमाणात औषध साठा उपलब्ध असून, सर्व रुग्णालयात थाळी पध्दतीने आहार सेवा कंत्राटी पध्दतीने सुरु आहे. तसेच सर्व रुग्णालयात कंत्राटी पध्दतीने स्वच्छता सेवा उपलब्ध असून या कंत्राटी कर्मचारी तसेच गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांद्वारे रुग्णालयाची स्वच्छता ठेवली जाते. याप्रकरणी कोणत्याही रुग्णालयात लेखी स्वरुपाच्या तक्रारी प्राप्त झालेल्या नाहीत

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उरण (जि.रायगड) ग्रामीण रुग्णालयातील गैरसोईबाबत

**(१३) ४६५९८ (१३-०१-२००९). श्री.जयंत पाटील, श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उरण (जि.रायगड) ग्रामीण रुग्णालयात उपचार घेण्यासाठी दररोज सुमारे ३००-४०० रुग्ण दाखल होतात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या रुग्णांवर उपचार करण्यासाठी आवश्यक वैद्यकीय अधिकारी नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर रुग्णालयातील सोनोग्राफी मशीन गेली दीड वर्षे बंद अवस्थेत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रश्न भाग (२) व (३) प्रकरणी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०९-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

सदर रुग्णालयात दररोज सरासरी प्रमाणे १५०-१७५ रुग्ण उपचारार्थ येतात.

(२) हे खरे नाही.

वैद्यकीय अधिक्षक हे पद रिक्त आहे. १ अस्थिरोग तज्ञ, १ भूलतज्ञ आणि १ एमबीबीएस वैद्यकीय अधिकारी ही पदे भरलेली असून त्यांच्याकडून उपचार सुविधा पुरविण्यात येत आहेत.

(३) अंशत: खरे आहे.

वैद्यकीय उपकरणाच्या निकषानुसार ग्रामीण रुग्णालयाकरीता सोनोग्राफी मशीन अनुज्ञेय नाही. तथापि, २००७ मध्ये सदर ग्रामीण रुग्णालयाकरीता सोनोग्राफी मशीन उपलब्ध करुन देण्यात आली होती. तेथील रेडीओलॉजीस्टने काम बंद केल्याने सदर मशीन विनावापर पडून असल्याने सदर मशीन उपजिल्हा रुग्णालय, मूल जि.चंद्रपूर येथे स्थलांतरीत केली आहे.

(४) ग्रामीण रुग्णालय, उरण येथे वैद्यकीय अधिक्षक हे पद रिक्त असून वैद्यकीय अधिकाऱ्यांची ३ पदे मंजूर असून भरलेली आहेत. वैद्यकीय अधिक्षकाचे पद भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्य पुरातत्व विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१४) ४६६३९ (०५-०७-२०१९). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, अॅड.राहुल नार्वेकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य पुरातत्व विभागातील वर्ग ‘अ’ मधील दोन पदे, वर्ग ‘ब’ मधील १४ पदे, वर्ग ‘क’ मधील ३५ पदे आणि वर्ग ‘ड’ मधील ७२ पदे रिक्त असून मंजूर ३०० पदांपैकी १२३ पदे रिक्त असल्याने ११ अधिकाऱ्यांकडे अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आल्याचे माहिती अधिकारात माहे एप्रिल, २०१९ च्या दुसऱ्या पंधरवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच संरक्षित स्मारकांच्या संवर्धनाची जबाबदारी असणाऱ्या पुरातत्व व वस्तुसंग्रहालयाच्या संचालनामध्ये मंजूर पदापैकी ११० जागा रिक्त असल्याचे माहे मे, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील एकूण २७७ हेरिटेज वास्तूंमध्ये राज्याच्या पुरातत्व विभागाच्या अखत्यारित ५५ किल्ल्यांचा समावेश असून वारसा वास्तूंच्या देखभालीसाठी असलेला कर्मचारी वर्ग अत्यंत अपुरा असल्याचे निदर्शनास आले असून सन २०१६ ते २०१८ या तीन वर्षाच्या कालावधीत केवळ सहा कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली, हे खरे आहे काय,
(४) तसेच, पुरातत्व विभागाला राज्य शासनाकडून मिळणारा निधी कमी पडत असून स्वयंसेवी संस्थाकडून मदत घ्यावी लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील किल्ले संवर्धनाच्या महत्वाच्या बाबींकडे लक्ष देण्यासाठी पुरातत्व विभागातील रिक्त पदे भरण्याच्यादृष्टीने तसेच पुरेसा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-०९-२०१९)** : (१) सद्य:स्थितीत पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयास गट अ ते गट ड मधील एकूण ३०० पदे मंजूर असून त्यापैकी गट अ, ब, क व ड संवर्गातील अनुक्रमे २, १४, ३७ व ७५ अशी एकूण १२८ पदे रिक्त आहेत.

सद्य:स्थितीत संचालनालयातील गट अ व ब च्या १६ रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार इतर ९ अधिकारी/कर्मचारी यांच्याकडे सोपविण्यात आलेला आहे.

(२) दि.३१/०५/२०१९ रोजी संचालनालयात एकूण ३०० मंजूर पदांपैकी एकूण १२४ पदे रिक्त होती.
(३) राज्यातील वारसा (हेरिटेज) वास्तुंमध्ये राज्य पुरातत्व विभागाच्या अखत्यारितील ५१ किल्ल्यांचा समावेश असून या वारसा वास्तुंच्या देखभालीसाठी सध्याचा कर्मचारी वर्ग अपूरा आहे, ही वस्तुस्थिती आहे. सद्य:स्थितीत संचालनालयात सन २०१६ ते २०१८ या कालावधीत विविध संवर्गातील एकूण ६ पदे भरण्यात आलेली आहे.
(४) हे खरे नाही.

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाच्या अखत्यारितील ३७६ राज्य संरक्षित स्मारकाकरीता उपलब्ध होणारा निधी अपूरा असला तरी

आजतागायत विभागाने कोणत्याही स्वयंसेवी संस्थांकडून निधी घेतलेला नाही.
(५) शासनाने दि.२०/०६/२०१९ रोजी पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयातील तसेच अधिपत्याखालील कार्यालयातील गट क संवर्गातील एकूण २० पदे सरळसेवेने व गट ड संवर्गातील ३० पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार पदभरती संदर्भात कार्यवाही सुरु आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## प्रदूषित होत असलेल्या जलसाठ्यांवर प्रतिबंध घालण्याबाबत

**(१५) ४६६४५ (०५-०७-२०१९). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्रीय पेयजल आणि स्वच्छता मंत्रालयाच्या ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत देशभरातील सर्वच राज्यात जलस्त्रोतांची तपासणी करण्यात आली असून, सदर तपासणीत राज्यातील १ लाख ७१ हजार ४८४ जलस्त्रोत दूषित असल्याचे आढळून आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पाण्यातील रसायनांचे प्रमाण उद्योगांमुळे वाढत असले तरी घरगुती सांडपाणीही तेवढेच जबाबदार असल्याचे तसेच जलस्त्रोत दूषित होण्यामागे जीवानुपेक्षा रासायनिक प्रभाव अधिक असल्याचे या तपासणीतून आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रदूषित होत असलेल्या जलसाठ्यांना परिणामकारकरीत्या प्रतिबंध घालण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (२३-०९-२०१९) :** (१) सन २०१८-१९ च्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावरील अहवालानुसार, १,९१,७६९ स्त्रोतांपैकी ४०,६८७ स्त्रोत रासायनिक दृष्टया दुषित असून १,२५,५६८ स्त्रोतांपैकी २१,४८७ स्त्रोत जैविक दृष्टया दुषित आढळून आले आहेत.

(२) केंद्र शासनाच्या संकेतस्थळावरील अहवालानुसार रासायनिक दृष्टया दूषित स्त्रोतांचे प्रमाण २१.२२% तर जैविक दृष्टया दूषित पाण्याचे प्रमाण १७.११% आहे. रासायनिक दृष्टया बाधित स्त्रोतांची कारणे पुढीलप्रमाणे- खतांच्या अतिरिक्त वापरामुळे नायट्रेट, स्थानिक भूगर्भीय परिस्थितीमुळे फ्लोराईड, लोहाच्या खनिजांमुळे लोह आणि भूपृष्ठावरील प्रवाह, इतर घटक यांच्या परिसंचरणामुळे तसेच भूगर्भीय परिस्थितीमुळे क्षार इत्यादी घटक कमी जास्त होत असल्याचे आढळून आले.

(३) जिल्हा परिषदेमार्फत रासायनिक दृष्टया बाधित स्त्रोतांवरती पिण्याच्या पाण्यास अयोग्य असे फलक लावण्यात येतात. फ्लोराईड व क्षार बाधित गावांना DFU (De-Fluoridation Unit) RO (Reverse Osmosis) मार्फत शुध्द पाणीपुरवठा करण्याचे काम प्रगतिपथावर आहे. तसेच दर पावसाळयाआधी जलजन्य आजार पसरू नये म्हणून पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांबाबत घ्यावयाच्या प्रतिबंधात्मक सूचना जिल्हा परिषदेमार्फत प्रसारित करण्यात येतात. तसेच जनमानसात पिण्याच्या पाण्याच्या गुणवत्तेबाबत तसेच पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांची घ्यावयाची काळजी याबाबत जिल्हा व तालुकास्तरावर जिल्हा परिषदेमार्फत जन जागृती केली जाते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्याच्या नव्या औद्योगिक धोरणाबाबत

**(१६) ४६६७६ (०६-०७-२०१९). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात येत्या ५ वर्षात ४० लाख रोजगारांची निर्मिती तसेच १० लाख कोटींची गुंतवणूक आकर्षित करण्याचे उद्दिष्ट ठेवून नव्या औद्योगिक

धोरणाची घोषणा शासनाने माहे मार्च, २०१९ च्या पहिल्या सप्ताहात एका पंचतारांकित हॉटेलमध्ये केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नव्या औद्योगिक धोरणाचे थोडक्यात स्वरुप काय आहे तसेच त्याची अंमलबजावणी कशा पध्दतीने होणार असून हे धोरण केव्हापासून अंमलात येणार आहे,
(३) असल्यास, मागील ५ वर्षात राज्यात औद्योगिक धोरणातून गुंतवणुकीचे प्रमाण किती वाढले आहे व किती रोजगार निर्मिती झाली व होत आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२३-०९-२०१९)** : (१) व (२) महाराष्ट्राचे नवीन औद्योगिक धोरण-२०१९ दिनांक ०७/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले असून, त्यामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश आहे.

- २०२५ पर्यंत महाराष्ट्र एक ट्रिलियन डॉलरची अर्थव्यवस्था बनविण्याचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या उद्देशाने महाराष्ट्राचे नवीन औद्योगिक धोरण जाहीर करण्यात आले.
- महाराष्ट्राला जागतिक स्तरावरील गुंतवणूकीचे व उत्पादनाचे केंद्र बनविणे.
- ६० लक्ष इतका नवीन रोजगार निर्माण करणे.
- सन २०२३ पर्यंत राज्यात रुपये १० लाख कोटी गुंतवणूक आकर्षित करणे.
- सन २०२३-२४ पर्यंत ४० लाख लोकांसाठी रोजगाराच्या संधी निर्माण करणे.
- सन २०२३-२४ पर्यंत राज्याच्या सकल उत्पन्नात उत्पादन क्षेत्राचा हिस्सा २५ टक्क्यापर्यंत आणण्याचे उद्दिष्ट गाठण्यासाठी उत्पादन क्षेत्राच्या वाढीचा दर १२ ते १३ टक्के पर्यंत राखणे.
- सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांचे प्रवर्तन करणे- महिला व अनुसूचित जाती-जमाती उद्योजकांवर विशेष लक्ष केंद्रीत करणे.

- राज्यात ईज ऑफ डुइंग बिझनेस (EODB) च्या माध्यमातून उद्योगांचे सुलभीकरण करणे.
- नवीन ग्रोथ सेंटरचे / क्लस्टरचे प्रचलन करणे.
- बेराजगार तरुणांना रोजगार पुरविण्यासाठी मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना नवीन फ्लॅगशिप योजनेचा शुभारंभ या नवीन योजनेची आखणी करणे.

वरील महत्वाच्या बाबी तसेच महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९ हा शासन निर्णय जनतेच्या माहितीसाठी शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर धोरण दिनांक ०१ एप्रिल, २०१९ पासून अंमलात आले असून, पुढील ५ वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहील.

(३) मागील ५ वर्षात राज्याच्या औद्योगिक धोरणातून रुपये २१४२०० कोटी इतकी गुंतवणूक झाली असून एकूण ६३४७००० इतकी रोजगार निर्मिती झाली आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आर्णी (जि.यवतमाळ) तालुक्यातील वन विभागाने वृक्ष लागवड केलेली जमीन ओसाड असल्याबाबत

**(१७) ४६७५४ (०५-०७-२०१९). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्णी (जि.यवतमाळ) तालुक्यातील वन विभागाने सन २०१६-१७ मध्ये लाखो रुपये खर्च करुन बावीस हजार खड्डे करुन वृक्ष लागवड केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बावीस हजार खड्डे करण्यात आलेली जमीन ही ओसाड असल्याची बाब माहे एप्रिल, २०१९ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने पाहणी केली आहे काय, पाहणीत काय आढळून आले व त्याची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२४-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

सन २०१६-१७ मध्ये आर्णी तालुक्यात एकूण १८५ हेक्टर क्षेत्रावर १८६२७० इतकी रोपांची लागवड करण्यात आली असून मे, २०१९ अखेर जिवंत रोपांची टक्केवारी ६६.५४ % इतकी आहे. पूर्व पावसाळी कामामध्ये खड्डयांवर व प्रथम वर्षीय वृक्ष लागवडीवर अनुक्रमे ३९.९२ लक्ष व ५९.३७ लक्ष इतका खर्च करण्यात आलेला आहे.

(२) हे खरे नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात विविध विभागातील रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरण्याबाबत

**(१८) ४६९०३ (०६-०७-२०१९). श्री.रामदास आंबटकर, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने राज्यात विविध विभागातील रिक्त पदाची भरती कंत्राटी पध्दतीने भरण्याचा निर्णय घेण्यात आल्याचे दिनांक ११ डिसेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरण्याचा शासन आदेश वित्त विभागाने दिनांक १४ डिसेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास काढला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरण्याची कारणे काय आहेत, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२६-०९-२०१९) :** (१) व (२) होय. वित्त विभागाच्या दि.११/१२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना जुन्या आकृतिबंधानुसार मंजूर असलेल्या पदांपैकी रिक्त असलेल्या पदांच्या ७०

टक्के मर्यादेत पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास, तसेच विवक्षित कामासाठी सेवानिवृत्त अधिकाऱ्यांच्या सेवा करार पध्दतीने घेण्यास फक्त एक वर्षाच्या कालावधीसाठी मुभा देण्यात आली आहे.
(३) प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक ठरविण्यात आले आहे. तसेच सुधारित आकृतिबंध अंतिम झाल्याखेरीज विभागांनी पदनिर्मिती / पदभरती करु नये अशा सूचना आहेत. तथापि, सदर कार्यवाहीस काही कालावधी लागणे अपेक्षित असल्यामुळे प्रशासकीय विभागांना येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन फक्त एक वर्षाच्या कालावधीसाठी कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करायची मुभा देण्यात आली आहे. दरम्यानच्या कालावधीत प्रशासकीय विभागांनी सुधारीत आकृतिबंध अंतिम करुन घेण्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करणे अपेक्षित आहे. यासंदर्भात चौकशी करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्पांतर्गत परिवहन धोरण ठरविण्याबाबत

**(१९) ४७०४३ (०५-०७-२०१९). ॲड.अनिल परब** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्पांतर्गत सन २०१८ मध्ये मुंबई महानगर प्रदेशातील लोकांच्या प्रवासाची पध्दत व प्रकार जाणून घेण्यासाठी तसेच सन २०३१ पर्यंत दीर्घकाळ परिवहन धोरण ठरविण्यासाठी "परिवहन अभ्यास" तयार करुन अंतिम अहवाल माहे जुलै, २००८ मध्ये शासनास सादर केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या अहवालात कोणकोणत्या शिफारशी करण्यात आल्या आहेत व त्याचे फायदे काय आहेत तसेच या शिफारशी शासनाने स्वीकारल्या आहेत काय,
(३) असल्यास, त्यानुषंगाने शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली व याबाबतची सद्यःस्थिती काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०८-२०१९) :** (१) मुंबईतील वाहतूक व परिवहन व्यवस्था सक्षम, कार्यक्षम आणि सुधारणा करण्यासाठी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने मुंबई नागरी परिवहन प्रकल्प (MUTP) अंतर्गत, जागतिक बँकेच्या तांत्रिक सहाय्याने वर्ष २००५-२००८ मध्ये सल्लागारामार्फत सर्वंकष परिवहन अभ्यास (Comprehensive Transportation Study) आणि व्यवसाय आराखडा (Business Plan) प्राधिकरणास वर्ष २००८ मध्ये सादर केला.

सदर सर्वंकष परिवहन अभ्यास अहवालास दिनांक १५ मार्च, २००८ रोजी झालेल्या प्राधिकरणाच्या १२१ व्या बैठकीत मान्यता मिळाली आहे.

(२) सर्वंकष परिवहन अभ्यास २००८ च्या अहवालानुसार मुंबई महानगर प्रदेशासाठी क्षितीज वर्ष २०३१ पर्यंत ४५० कि.मी. चे मेट्रो मार्गाचे, २४८ कि.मी. उपनगरीय रेल्वे मार्गाचे आणि १७४० कि.मी. चे रस्त्यांचे जाळे प्रस्तावित/शिफारस केलेले आहे. प्रस्तावित मार्गाची (मेट्रो, उपनगरीय रेल्वे आणि महामार्ग) प्रस्तावित कालावधीत अंमलबजावणी झाल्यास वाहतूक कोंडी, प्रदूषण आणि प्रवाशी वेळेत परिणामकारक बचत होईल. तसेच वाहतूक परिवहन व्यवस्थेच्या टक्क्यामध्ये सुधारणा होईल.

(३) अभ्यासात नमूद केलेल्या विविध परिवहन योजना व प्रकल्पांच्या शिफारशींचा प्रामुख्याने विचार करुन त्यांचे नियोजनबध्द व निधी उपलब्धतेनुसार संबंधित संस्थांमार्फत अंमलबजावणी करण्यात येत आहे.

सर्वंकष परिवहन अभ्यास व व्यवसाय आराखडा अभ्यास पूर्ण झाल्यानंतर गेल्या दशकात, महानगर प्रदेशात मोठ्या प्रमाणात परिवहन आणि जमीन वापर (Land use) यात सुधारणा/बदल झाले आहेत. यामध्ये प्रामुख्याने वडाळा येथील नवीन (रहिवासी आणि व्यवसायिक) जमीन वापर, मुंबई आंतरराष्ट्रीय विमानतळाच्या संचालनालयातील सुधारणा, नवीन मेट्रो आणि मोनो रेल, प्रस्तावित नवी मुंबई विमानतळ (NMIA), नवी मुंबई विमानतळ प्रभावित क्षेत्र (NAINA), जेएनपीटी येथे प्रस्तावित विशेष आर्थिक क्षेत्र (SEZ), कल्याण आणि भिवंडी परिसरात २७ आणि ५१ गावांचा विकास आराखडा, प्रस्तावित जलवाहतूक प्रकल्प इत्यादींचा समावेश आहे.

वर उल्लेखीत प्रस्तावित पायाभूत सुविधांमुळे बदल आणि यांचा परिणाम लक्षात घेऊन सर्वंकष परिवहन अभ्यासाचे अद्यावतीकरणाचे काम

सल्लागारामार्फत प्रगतीपथावर आहे. सदर अभ्यासामध्ये मुंबई महानगर प्रदेशासाठी क्षितीज वर्ष २०२१, २०२६, २०३१ आणि २०४१ साठी अनुक्रमे तत्काळ, लघु, मध्यम आणि दीर्घ मुदतीसाठीचा परिवहन आराखडा तयार करण्यात आला आहे. सल्लागारामार्फत सदर अभ्यासाचा अंतिम मसुदा अहवाल लवकरच प्राधिकरणास सादर होणे अपेक्षित आहे.

---

## प्रधानमंत्री किसान सन्मान योजनेचा लाभ शेतकऱ्यांना देण्याबाबत

**(२०) ४७०६४ (०५-०७-२०१९). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शेतकऱ्यांना निश्चित उत्पन्न मिळण्यासाठी जिल्ह्यातील ४ लक्ष ४८ हजार शेतकऱ्यांपैकी केवळ १.५० लक्ष शेतकऱ्यांची नोंदणी माहे मार्च, २०१९ पर्यंत करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रधानमंत्री किसान सन्मान योजनेचा लाभ वरील सर्व शेतकऱ्यांना मिळण्यासाठी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, कार्यवाहीची थोडक्यात माहिती काय आहे तसेच किती मुदतीत वरील सर्व शेतकऱ्यांना योजनेचा लाभ देण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अनिल बोंडे (२८-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.

प्रधानमंत्री किसान सन्मान योजनेचा लाभ शेतकऱ्यांना निश्चित उत्पन्न मिळण्यासाठी राज्यात माहे मार्च, २०१९ पर्यंत ६४.५४ शेतकऱ्यांची नोंदणी करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत दिनांक २३/०७/२०१९ अखेर सर्व जिल्हाधिकारी यांच्या प्राप्त प्रमाणपत्रानुसार अपेक्षित लाभार्थी संख्या ९३.२५ लक्ष असून त्यापैकी एकूण ८९.७२ लक्ष शेतकऱ्यांची नोंदणी करण्यात आली आहे.

(२) क्षेत्रियस्तरावर पात्र लाभार्थी शेतकरी यांची माहिती पी. एम. किसान पोर्टवर अपलोड करण्यासाठी शासनामार्फत वारंवार पत्रव्यवहार व्हिडीओ कॉन्फरन्स व्दारे, दूरध्वनीव्दारे सूचना देऊन पाठपुरावा करण्यात येत आहे.

(३) दिनांक २५ जुलै, २०१९ अखेर ३०.०१ लाख लाभार्थी शेतकऱ्यांना पहिला हप्ता रुपये २०००/- प्रति लाभार्थी या प्रमाणे रुपये ६००.२० कोटी, त्याचप्रमाणे या लाभार्थी शेतकऱ्यांपैकी १५.५४ लाख लाभार्थी शेतकऱ्यांना दुसरा हप्ता रुपये २०००/- प्रति लाभार्थी या प्रमाणे रुपये ३१०.७४ कोटी अशी एकत्रित रक्कम रुपये ९१०.९४ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गडचिरोली जिल्ह्यातील शेतकरी वन पट्ट्यापासून वंचित राहिल्याबाबत

**(२१) ४७०९४ (०५-०७-२०१९). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली जिल्ह्यात गेल्या ४० वर्षापासून वन जमिनीवर आदिवासी व गैरआदिवासी शेतकऱ्यांनी अतिक्रमण केले असून उक्त जमिनीवर शेती करुन कुटुंबाचा उदरनिर्वाह करीत असूनही मागील १० वर्षात ५९ हजार दाव्यापैकी ४० हजार दावे महसूल विभागाने नाकारले गेल्याने जिल्ह्यातील शेतकरी वन पट्यापासून वंचित असल्याचे दिनांक ८/०४/२०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अशोक उईके (१८-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम, २००६ नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ अंतर्गत गडचिरोली जिल्ह्यामध्ये ग्रामस्तरीय वनहक्क समितीकडे एकूण ५९,६०९

इतके दावे प्राप्त झाले असून त्यापैकी ३१,३२२ इतके दावे मंजूर केले आहेत तर ५,३२२ इतके दावे नामंजूर केले आहेत.

(२) ग्रामस्तरावरील (वन हक्क समिती) व उपविभागीय स्तरावरील (वन हक्क समिती) प्रलंबित वन हक्क दावे व अपीले यांचा निपटारा करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्र.वहका-२०१८/प्र.क्र.४३/का.-१४, दिनांक ११ मे, २०१८ नुसार उपविभाग स्तरीय समित्यांकडून दावे/अपीले नाकारण्यात आलेल्या प्रकरणात संबंधित वनधारकांना त्यांचे म्हणणे मांडण्याची संधी देण्यात आली आहे व त्यासंदर्भात गडचिरोली जिल्ह्यात वनमित्र मोहिम राबविण्यात आली आहे.

जिल्हास्तरीय समितीकडून नामंजूर करण्यात आलेल्या प्रकरणात आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्या मार्फत माहे एप्रिल, २०१९ मध्ये प्रकरणांची तपासणी करण्यात आलेली आहे.

(३) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पदवीधर अंशकालीन उमेदवारांना सेवेत सामावून घेण्याबाबत

**(२२) ४७१२९ (०६-०७-२०१९). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे, ॲड.अनिल परब, श्री.प्रकाश गजभिये, श्री.विलास पोतनीस** : सन्माननीय **कौशल्य विकास व उद्‌योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पदवीधर अंशकालीन उमेदवारांना सेवेत सामावून घेण्याबाबचा गत १५ वर्षापासून प्रलंबित प्रश्न निकाली काढण्याकरीता तसेच अंशकालीन उमेदवारांना विशेष बाब म्हणून कंत्राटी तत्वावर नोकरीची संधी उपलब्ध करुन देण्याचा धोरणात्मक निर्णय घेण्याकरीता दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीने आपला अहवाल शासनास सादर केला आहे काय, सादर केलेल्या अहवालातील शिफारशींचे थोडक्यात स्वरूप काय आहे,

(३) तसेच उक्त अहवालाच्या अनुषंगाने शासनस्तरावर कोणता धोरणात्मक निर्णय घेण्यात आला वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (३१-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत समितीने त्यांचा अहवाल शासनास दिनांक ०६/०९/२०१८ रोजी सादर केला आहे. या समितीच्या अहवालातील शिफारशीचे थोडक्यात स्वरुप पुढीलप्रमाणे आहे :-

१. राज्यातील पदवीधर अंशकालीन उमेदवारांच्या माहितीनुसार एकूण १८,६४४ पदवीधर अंशकालीन उमेदवारांच्या यादीला अंतिम मान्यता देणे,

२. पदवीधर अंशकालीन उमेदवारांना वयाची कोणतीही अट न ठेवता करार तत्वावर नेमणूक देणे.

३. शासनाच्या विविध कार्यालयीन आस्थापनांवर करार तत्वावर कर्मचाऱ्यांची नेमणुका करण्यात येतात अशा ठिकाणी पदवीधर अंशकालीन उमेदवारांना नियुक्तीत प्राधान्य देणे.

४. पदवीधर अंशकालीन उमेदवारांना करार तत्वावर नेमणूक दिल्यानंतर प्रति उमेदवार रुपये १५,००० प्रति महिना याप्रमाणे १८,६४४ उमेदवारांकरीता येणारा वार्षिक खर्च रुपये ३३५.५९ कोटीचा बोजा शासनावर पडणार असून हा निधी वित्त विभागाने उपलब्ध करून द्यावा.

५. राज्यामध्ये कोठेही पी.पी.पी. तत्वावर सुरु असलेल्या प्रकल्पामध्ये पदवीधर अंशकालीन उमेदवारांना प्रथम प्राधान्य देण्यात यावे.

६. पदवीधर अंशकालीन उमेदवार हे ज्या जिल्ह्यामधील रहिवाशी असतील त्या जिल्ह्यामध्ये त्यांना करार तत्त्वावर नियुक्तीस प्रथम प्राधान्य देण्यात यावे जर ते शक्य नसल्यास त्यांच्या महसूली विभागातील अन्य जिल्ह्यात करार तत्त्वावर नियुक्ती देण्यात यावी.

(३) गठीत समितीच्या अहवालातील शिफारशींच्या अनुषंगाने दिनांक ११/१२/२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार (अ) सामान्य प्रशासन, विभाग शासन निर्णय, दिनांक ०२/०१/२०१९ अन्वये, पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क पदावरील सरळ सेवेने करावयाच्या नियुक्तीसाठी ५५ वर्षे इतकी वयोमर्यादा शिथील करणे (ब)

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन परिपत्रक दिनांक ०२/०३/२०१९ अन्वये, बाह्ययंत्रणेकडून (आऊटसोर्सिंगद्वारे) कामे करुन घेण्याबाबत पदवीधर अंशकालीन उमेदवारांना सूट देवून वैयक्तिकरित्या प्राधान्याने नेमणूक देणे (क) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय, दिनांक १७/०६/२०१९ अन्वये, पदवीधारक (बी.एड) / पदविकाधारक (डी.एड) अंशकालीन उमेदवारांना तासिका तत्त्वावर किंवा करारपध्दतीने कामे देण्याबाबतचे शासन निर्णय/परिपत्रक निर्गमित करण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मैदानासाठी आरक्षित भूखंड भूमाफियांकडून बळकावण्याचा प्रयत्न सुरु असल्याबाबत

**(२३) ४७१६८ (१२-०७-२०१९). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे, ॲड.अनिल परब, श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भाईंदर पूर्व (जि.ठाणे) येथील सरस्वतीनगर स्थित गुरुद्वाराजवळ मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मैदानासाठी आरक्षित असलेला भूखंड भूमाफियांकडून बळकावण्याचा प्रयत्न सुरु असल्याचे माहे मार्च, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त मैदानाच्या मध्यभागी सिमेंटचे खांब ठोकून भूमाफियांनी हा भूखंड बळकावण्याचा प्रयत्न केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार संबंधित भूमाफियांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०९-२०१९) :** (१), (२) व (३) मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मंजूर विकास योजनेनुसार मौजे खारी येथे १२२क हे खेळाच्या मैदानाचे आरक्षण आहे.

सदर आरक्षणाचे एकूण क्षेत्र ३८,००० चौ.मी. असून त्यापैकी १७६५५.९८ चौ.मी. क्षेत्र विकास हक्क प्रमाणपत्राद्वारे मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या नावे झालेले आहे. उर्वरित क्षेत्र महानगरपालिकेच्या ताब्यात आलेले नाही.

सदर जागेवर महानगरपालिकेने जागा समतल करून मुलांना खेळण्यासाठी मैदान उपलब्ध करून दिलेले आहे.

मार्च, २०१९ मध्ये सदर मैदानाच्या जागेवर सिमेंटचे खांब टाकल्याचे निदर्शनास आल्यावर सदर खांब तात्काळ काढून जागा मोकळी करण्यात आलेली आहे.

सद्य:स्थितीत सदर जागेचा वापर खेळाच्या मैदानासाठी होत आहे, ही वस्तुस्थिती आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लॉटरी व्यवसायावर जीएसटी आकारल्याबाबत

**(२४) ४७१८२ (०५-०७-२०१९). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अनिकेत तटकरे, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मटका आणि जुगाराला आळा घालण्यासाठी शासनाने सुरु केलेल्या लॉटरी व्यवसायावर केंद्र शासनाने दिनांक १ जुलै, २०१७ रोजीपासून २८ टक्के जीएसटी आकारल्यामुळे या व्यवसायाकडे ग्राहकांनी दुर्लक्ष केले असल्याचे दिनांक ६ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील लाखो लॉटरी विक्रेते युवक आणि कुटूंबाची गुजराण चालत असलेल्या या व्यवसायावर आलेल्या गंडांतरामुळे राज्यातील ८ लाखांहून अधिक कुटूंबावर आर्थिक संकट ओढविले आहे तसेच शासनाच्या या

करामुळे बेकार झालेले युवक, अंध-दिव्यांग आणि जेष्ठ नागरिक यांना न्याय मिळाला नाही तर त्यांनी आंदोलन करण्याचा इशारा दिला असून सदर प्रकरणी शासनाने पुनर्विचार करावा अशी मागणी लॉटरी विक्रेतेचे अध्यक्ष यांनी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने लॉटरी व्यवसायावर आकारलेला जीएसटी रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२५-१०-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील ग्राहकांना सुरळीत वीज मिळण्याबाबत

**(२५) ४७१९० (०६-०७-२०१९). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.मोहनराव कदम, श्री.अमरनाथ राजूरकर, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अडीच कोटी ग्राहकांना वीज पुरवण्याची जबाबदारी महावितरण या वीज कंपनीवर असून महावितरण वीज वितरण करीत असताना वीजचोरी, तांत्रिक बिघाड, वीज वाहिन्यांचे जाळे मोठे असल्याने १३-१४ टक्के विजेची गळती होत असून ग्राहकांना प्रतियुनिटमागे सुमारे १ रुपया भुर्दंड पडत असल्याचे माहे फेब्रुवारी, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महावितरणाने खरेदी केलेल्या एकूण विजेपैकी १६-१७ टक्के म्हणजे सुमारे १५ हजार दशलक्ष युनिट वाया जात असून ग्राहकांपर्यंत केवळ एक लाख दशलक्ष युनिट वीज पोहचत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्राहकांना सुरळीत वीज मिळण्याबाबत कार्यवाही करुन वीज चोरी करणाऱ्या संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०६-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

विद्युत अधिनियम, २००३ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगास विविध बाबी लक्षात घेऊन वीजदर निश्चित करण्याचे अधिकार असून आर्थिक वर्ष २०१८-१९ साठी मंजूर केलेले वीज गळतीचे लक्ष्य १३.४९ % आहे. महावितरणची आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये वितरण हानी १३.६४ % इतकी आहे. वीज गळतीचे लक्ष हे आयोगाद्वारे नियामक प्रक्रियेअंती मंजूर केले आहे. तसेच वीज गळती ही कुठल्याही वीज प्रणालीचा अविभाज्य भाग असून ती वीजवाहक तारा व रोहित्रातून होणाऱ्या भौतिकीय वीजवहन सिध्दातांशी निगडीत आहे. त्यामुळे विजेची गळती होत असल्याने ग्राहकांना प्रति युनिटमागे १ रुपया भुर्दंड पडत नाही.
(२) आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये असलेल्या १३.६४ % इतक्या वितरणहानी मुळे १८०६५ दशलक्ष युनिटची हानी झालेली आहे. यापैकी काही युनिटचे रुपांतर हे वीजवाहक तारा व वीज उपकरणातून वीज वाहत असताना उष्णतेमध्ये होते व उर्वरित युनिटचे रुपांतर वाणिज्यिक हानी (वीज चोरी) मध्ये होते.
(३) तांत्रिक हानी व वाणिज्यिक हानी कमी करणेसाठी महावितरण कंपनीतर्फे विविध उपाययोजना राबविण्यात येतात. केंद्रिय वीज बिल प्रणालीद्वारे सर्व ग्राहकांना योग्य बिल देण्याकरीता यंत्रणा सशक्तीकरण, वीज चोरीवर आळा घालण्याकरीता विविध उपाययोजना तसेच वितरण प्रणालीत सुधारणा करणेसाठी विविध पायाभूत सुधारणा योजना राबविल्या जात आहेत. वितरण प्रणाली सुधारणेसाठी नवीन उपकेंद्रे उभारणी, उपकेंद्राची क्षमता वाढ करणे, नवीन उच्चदाब वाहिन्या/लघुदाब वाहिन्या तसेच नवीन रोहीत्र उभारणी करणे ही कामे नियमित करण्यात येतात. वितरण प्रणाली व बिलिंग प्रणाली सुधारणेमुळे तांत्रिक हानी कमी होण्यास मदत होते. राज्यातील वीज चोरीचे, गळतीचे प्रमाण कमी करण्यासाठी महावितरण कंपनीकडून सातत्याने प्रयत्न

केला जात आहे. याअंतर्गत राज्यात सर्व ठिकाणी नियमितपणे फिरती पथके व क्षेत्रिय कार्यालयांमार्फत वीज चोरी पकडण्याची मोहिम राबविण्यात येते. त्यामुळे वीज चोरीला आळा बसण्यास मदत होत आहे. मागील काही वर्षात आयोगाने ठरवून दिलेल्या वितरण हानीच्या उद्दीष्टापेक्षा प्रत्यक्षात वितरण हानी कमी राखण्यात महावितरण कंपनीने यश मिळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील सर ज.जी.कला महाविद्यालयात उभारण्यात आलेल्या कलांगणाचे उद्घाटन करण्याबाबत

**(२६) ४७१९४ (०५-०७-२०१९). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.मोहनराव कदम, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील सर ज.जी.कला महाविद्यालयात विद्यार्थ्यांच्या कलाकृतींना व्यासपीठ देण्यासाठी “कलांगण” नामक प्रदर्शन कट्टा उभारण्यात आला असून सदरहू कट्टा उद्घाटनाच्या प्रतिक्षेत असल्याचे दिनांक ९ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील कट्टयाच्या भोवताली उभारलेल्या भिंतीमध्ये झाडे-झुडपे उगवल्याचे चित्र दिसत असून कलांगणाचे उद्घाटन होऊन कलेला वाव मिळणार का असा प्रश्न विद्यार्थ्यांमधून उपस्थित होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२४-०९-२०१९) :** (१) होय,
सर ज.जी. कला महाविद्यालयांमधील पदवी अभ्यासक्रमांच्या प्रथम वर्ष प्रवेश प्रक्रियेची तसेच, अनुषंगिक माहिती विद्यार्थी व पालकांना एकाच

ठिकाणी उपलब्ध व्हावी, या उद्देशाने विद्युत प्रकाश योजनेसह लोखंडी फलक उभारण्यात आले आहेत. सदर लोखंडी फलक कला शाळा आवारात असल्यामुळे त्यास “कलांगण” असे नाव सुचित केले आहे. तथापि, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून पदवी अभ्यासक्रम प्रथम वर्ष प्रवेश प्रक्रिया आयुक्त, सामाईक प्रवेश परीक्षा प्राधिकरणामार्फत आयोजित करण्यात येत असून त्याबाबतची सर्व माहिती विद्यार्थी व पालकांना संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली आहे. त्यामुळे सदर कलांगणाचे औपचारिकरित्या उद्घाटन करणे प्रलंबित राहिले आहे.

(२) नाही.

कलांगणाच्या भोवतीच्या खुल्या आवारातील, भिंतीलगत पावसाळ्यात उगवणारे गवत / झाडे-झुडपे काढून नियमित साफसफाई करण्यात येते. सर ज.जी. कला महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या सुप्त कलागुणांना वाव मिळावा व त्यांच्या प्रतिभाशक्तींला हक्काचे व्यासपीठ मिळावे या दृष्टिकोनातून विद्यार्थ्यांच्या कलाकृती आळीपाळीने प्रदर्शित करण्यासाठी कलांगणाचा उपयोग करण्याचा निर्णय कला संचालनालयाकडून घेण्यात आला आहे. त्यानुसार कला संचालनालयाच्या स्तरावर समिती नियुक्त करुन विद्यार्थ्यांच्या कलाकृती व त्यांनी केलेले काम प्रदर्शित करण्याचे वेळापत्रक तसेच, नियमावली तयार करण्याचे काम सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी शहरांसह ग्रामीण भागातील आगारातून सुटणाऱ्या निकृष्ट दर्जाच्या बसबाबत

**(२७) ४७२८८ (०५-०७-२०१९). श्री.विप्लव बाजोरिया :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी शहरांसह ग्रामीण भागातील आगारातून सुटणाऱ्या निकृष्ट दर्जाच्या बसमधून प्रवाशांना प्रवास करावा लागत असल्याचे माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शहरासह ग्रामीण भागातील आगारातून निकृष्ट बस सोडण्यामागची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (३०-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) परभणी शहरासह ग्रामीण भागातील राज्य परिवहन महामंडळाच्या आगारांतून सोडण्यात येणाऱ्या सर्व बसेसची योग्यप्रकारे देखभाल करुन सुस्थितीत बसेस मार्गस्थ करण्यात येत आहेत. तथापि, परभणी विभागात मागील एक वर्षापासून परभणी, जिंतूर, पाथरी, वसमत व हिंगोली येथील मार्गांचे रुंदीकरण व दुरुस्तीची कामे सुरु असून, संबंधित रस्त्यांची अवस्था खराब झाल्याने राज्य परिवहन महामंडळाच्या बसेस वारंवार मार्गस्थ बिघाड होवून नादुरुस्त होत आहेत.

राज्य परिवहन वाहनांची स्थिती उत्तम ठेवण्याच्या अनुषंगाने वाहनांचे नियतकालिन कार्यक्रमानुसार पुन:स्थितीकरण व आरटीओ पासिंग करण्यात येत आहे. तसेच, खराब बॉडी कंडीशनची वाहने महामंडळाच्या विभागीय कार्यशाळेत मागवून त्यांची बॉडी संबंधित कामे करुन दिली जात आहेत. सन २०१७-१८ पासून परभणी विभागाच्या वाहन ताफ्यात १३ नवीन वातानुकूलित शिवशाही बसेस समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ओबीसी समाजाच्या कल्याण व विकासासाठी भरीव निधी देणेबाबत

**(२८) ४७३७३ (०५-०७-२०१९). श्री.हरिसिंग राठोड, श्री.रामहरी रुपनवर, डॉ.वजाहत मिर्झा :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील ओबीसी समाजाच्या कल्याण व विकासासाठी शासनाने स्वतंत्र ओबीसी मंत्रालय स्थापन केले असून तेथे शासकीय योजनांची अंमलबजावणी

करणाऱ्या प्रत्येक जिल्ह्यात इतर मागासवर्गीय महामंडळाचा कार्यभार दुर्लक्षित असल्याची बाब माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, इतर मागासवर्गीय महामंडळाच्या माध्यमातून ओबीसीसाठी थेट कर्ज व इतर कर्ज योजना राबविल्या जात असून विविध प्रकारचे व्यावसायिक व कौशल्यपूर्ण प्रशिक्षणही दिले जाते परंतु राज्यातील महामंडळाचा कारभार दर्जाहीन झाल्यामुळे ओबीसी युवक कर्ज योजनेपासून वंचित आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्यातील इतर मागासवर्गीय महामंडळाला भरीव निधी देवून ओबीसी युवकांचा विकास साधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. संजय कुटे (०७-०९-२०१९) :** (१) शासनाने ओबीसी समाजाच्या कल्याण व विकासासाठी स्वतंत्र मंत्रालय स्थापन केले आहे, ही बाब खरी आहे. तथापि, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळाचा कार्यभार दुर्लक्षित आहे, ही बाब खरी नाही.
(२) व (३) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळाच्या थेट कर्ज व इतर कर्ज योजनेपासून इमाव प्रवर्गातील सर्व पात्र कर्ज मागणी करणाऱ्या लाभार्थींना योजनांचा लाभ देण्यात आला आहे. राज्यात स्वतंत्र ओबीसी मंत्रालय स्थापन झाल्यानंतर महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळाकडून सन २०१७-१८ या वर्षात ८६३ लाभार्थींना रुपये २६९.२३ लक्ष व सन २०१८-१९ या वर्षात १५९ लाभार्थींना रुपये ५६.०९ लक्ष, असे एकूण रुपये ३२५.३२ लक्ष इतके कर्ज वाटप करण्यात आले आहे.

महामंडळ व्यावसायिक व कौशल्यपूर्ण प्रशिक्षणाची योजना राबवित नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात माहिती व जनसंपर्क विभागांतर्गत विविध जिल्ह्यात जिल्हा माहिती अधिकारी पद रिक्त असल्याबाबत

**(२९) ४७४७८ (०६-०७-२०१९). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.निलय नाईक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात माहिती व जनसंपर्क विभागांतर्गत १२ जिल्ह्यात जिल्हा माहिती अधिकारी पद रिक्त असल्याचे दिनांक १६ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर विभागीय संचालकाचे पद ही रिक्त असल्याने त्या कामाचा भार जिल्हा माहिती अधिकाऱ्यांकडे असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०८-२०१९) :** (१) होय.

(२) होय.

(३) अ) संचालकाचे एक पद सरळसेवेने भरण्यात आले असून दुसरे पद भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्यात आले आहे.

ब) जिल्हा माहिती अधिकाऱ्याचे एक पद सरळसेवेने भरण्यात आले असून ३ पदे सरळसेवेने भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याची कार्यवाही सुरु आहे. जिल्हा माहिती अधिकाऱ्यांची ३ पदे पदोन्नतीने भरण्यात आली आहेत.

क) माहिती अधिकाऱ्यांची ४ पदे पदोन्नतीने भरण्यात आली असून १२ पदे सरळसेवेने भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याची कार्यवाही सुरु आहे.

(४) अ) सरळसेवेची पदे भरण्यावर असलेली बंधने.

ब) पदोन्नतीमध्ये आरक्षण यासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयातील प्रलंबित प्रकरणांमुळे मागासवर्गीय अधिकाऱ्यांना द्यावयाच्या पदोन्नतीमध्ये अडसर.

क) पदांचा आढावा घेण्याची कार्यवाही सुरु असल्यामुळे पदभरतीवरील मर्यादा.

---

## राज्यातील वन विभागांतर्गत विशेषतः नागपूर विभागातील बदली पात्र असलेल्या वन कर्मचाऱ्यांबाबत

**(३०) ४७५५६ (०५-०७-२०१९). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.रामदास आंबटकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वन विभागांतर्गत विशेषतः नागपूर विभागातील बदली पात्र असलेल्या वन कर्मचाऱ्यांना त्यांच्या पसंतीच्या ठिकाणी नियुक्ती देण्याची प्रादेशिक वनसरंक्षक यांनी संकेतस्थळावर प्रसिध्द केले असल्याचे दिनांक २६ एप्रिल, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने बदली प्रकरणात कर्मचाऱ्यांना पसंतीप्रमाणे पारदर्शकपणा येण्यासाठी योग्य उपाययोजना केली आहे काय व जेष्ठता सुची प्रसिध्द करणार आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०३-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

नागपूर विभागातील बदली पात्र असलेल्या वन कर्मचाऱ्यांना त्यांच्या पसंतीच्या ठिकाणी नियुक्ती देण्याची यादी प्रादेशिक वनसंरक्षक यांनी संकेतस्थळावर प्रसिध्द केलेली नाही. तथापि, सन २०१९ च्या बदलीसत्रात नागपूर वनवृत्त अंतर्गत नागपूर, वर्धा, भंडारा व गोंदिया या विभागातील बदलीस पात्र असणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांची प्राथमिक व अंतिम ज्येष्ठता यादी माहे एप्रिल व मे, २०१९ मध्ये संकेतस्थळावर प्रसिध्द

करण्यात आली होती.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

तथापि, बदली प्रक्रियेत पारदर्शकता आणण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.०९/०४/२०१८ नुसार समुपदेशानाद्वारे बदलीबाबतचे धोरण अवलंबिण्यात आले. त्यानुसार बदलीपात्र कर्मचाऱ्यांकडून परिशिष्ट-१ सोबतचे विवरणपत्र-१ मध्ये १ ते १० पसंतीक्रम भरुन घेण्यात आले व नागरी सेवा मंडळाच्या समोर संबंधित कर्मचाऱ्यांचे सेवा तपशील आणि अनुषंगिक इतर बाबी लक्षात घेऊन, सर्वकष विचार करून नागरी सेवा मंडळाने शिफारस केली आहे.

तसेच समुपदेशनाद्वारे बदली धोरणानुसार बदलीसत्र राबविण्यात येणार असल्याचे तसेच कोणीही कोणत्याही प्रलोभनाला बळी न पडण्याचे आवाहन वन विभागाच्या संकेतस्थळावर दि.२३/०४/२०१९ रोजी प्रसिध्द करण्यात आले होते.

---

## राज्यातील जेष्ठ नागरिकांना एसटी बसमध्ये सवलत देण्याबाबत

**(३१) ४७८२६ (०५-०७-२०१९). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जेष्ठ नागरिकांची वयोमर्यादा ६० वर्षे असूनही महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमध्ये ६५ वर्षावरील जेष्ठ नागरिकांनाच सवलत दिली जात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ६० वर्षावरील जेष्ठ नागरिकांवर अन्याय होत असल्याने याबाबत शासनाने निर्णय घेऊन ६० वर्षे वय असलेल्या जेष्ठ नागरिकांना एसटी बसमध्ये सवलत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (३०-०८-२०१९) :** (१) होय.

(२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयानुसार सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरण निश्चित केले असून, सदर शासन निर्णयान्वये सामाजिक बाबींकरीता (अखर्चिक बाबी) ज्येष्ठ नागरिकांची वयोमर्यादा ६५ वरुन ६० व त्यापेक्षा अधिक अशी करण्यात आली आहे. त्यानुसार एस.टी.प्रवास सवलतीतही सदर वयोमर्यादा लागू करणेबाबत ज्येष्ठ नागरीकांच्या विविध संघटनांनी मागणी केली आहे. तथापि, गृह (परिवहन) विभागाने दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये विविध सामाजिक घटकांचा आढावा घेऊन सुधारित एस.टी. प्रवास सवलत योजना लागू केलेली आहे. त्यामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी साधी/निमआराम बसमध्ये ५०% व शिवशाही आसनीमध्ये ४५% व राज्य परिवहन महामंडळाच्या दि.३०/०५/२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये शिवशाही (शयनयान) बसमध्ये ३०% प्रवास सवलत ही ६५ वर्षे व त्यापेक्षा जास्त वयोमर्यादा असणाऱ्यांना लागू केली आहे.

तसेच, ज्येष्ठ नागरीकांना एस.टी.प्रवास सवलतीसाठी वयोमर्यादा ६५ वरुन ६० वर आणण्याची मागणी यावरील येणारा प्रचंड आर्थिक बोजा विचारात घेता सद्य:स्थितीत मान्य करणे योग्य होणार नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात एसटी महामंडळाकडून नॉन एसी स्लीपर बस मुंबईतून कोकणात चालविण्याच्या प्रस्तावाबाबत

**(३२) ४७९१६ (०५-०७-२०१९). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात एसटी महामंडळाकडून लवकरच ताफ्यात समाविष्ट होणाऱ्या नॉन एसी स्लीपर बस मुंबईतून कोकणात चालविल्या जाण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या बसेसची संख्या किती आहे व त्या कधीपर्यंत कार्यरत होणार आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१७-०९-२०१९) :** (१) व (२) होय.

राज्य परिवहन महामंडळाने माहे सप्टेंबर, २०१९ पासून राज्यातील कोकणासह विविध मार्गांवर २०० शयन-आसनी प्रकारच्या बसेस चालणात आणण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार महामंडळाद्वारे शयन-आसनी प्रकारातील बसेसच्या आवश्यक चासीस व त्यावर बांधण्यात येणाऱ्या बसबॉडी बांधणीसाठी ई-निविदा प्रसारीत केलेली आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सार्वजनिक बांधकाम उपविभाग, कराड (जि.सातारा) येथील उपअभियंता यांच्या गैरकारभाराबाबत

**(३३) ४७९३० (०५-०७-२०१९). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, अॅड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक बांधकाम विभाग, कराड (जि.सातारा) येथे उपअभियंता म्हणून ३ वर्षापेक्षा अधिक अतिरिक्त काळ कार्यरत असून त्यांनी खात्यांतर्गत विविध विकासकामे (दुरुस्ती) केल्याचे भासूवन गैरव्यवहार केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, स्थानिक ठेकेदारांना त्रास देऊन त्यांच्याकडे वारंवार पैशाची मागणी करुन ठेकेदारास वेठीस धरुन गैरव्यवहार केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने गैरव्यवहार करणाऱ्या दोषी अधिकाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०९-०९-२०१९) :** (१), (२), (३) व (४) सार्वजनिक बांधकाम विभाग, कराड येथील तीन वर्षापेक्षा अधिक कालावधीकरीता कार्यरत उप अभियंता यांची दिनांक १५/०६/२०१९ च्या शासन आदेशान्वये अन्यत्र बदली करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभाग, कराड येथे कार्यरत उपअभियंता यांचा कालावधी ३ वर्षापेक्षा जास्त नाही. तसेच अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा या कार्यालयाकडे कराड येथील स्थानिक ठेकेदारांच्या कराड मधील उपअभियंत्याबाबत सदर ठिकाणी गैरव्यवहार झाल्याची कोणतीही लेखी वा तोंडी तक्रार प्राप्त झालेली नाही.

---

## राज्यातील इंग्रजी शाळांच्या आरटीई शुल्क परताव्यासह इतर मागण्यांबाबत

**(३४) ४७९९० (०५-०७-२०१९). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांची सन २०१२ नंतर ची शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती शासनाने केली नसल्याने २५ टक्के विद्यार्थांच्या शुल्काचा भार अतिरिक्त ७५ टक्के विद्यार्थ्यांवर येत असल्याने पालकांमध्ये असंतोष निर्माण झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन २५ टक्के प्रवेशासाठी शाळांसाठी घातलेल्या जाचक अटी, नियम रद्द करुन त्यात सुधारणा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (२९-०७-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासनाने गठीत केलेल्या पी.व्ही. हरदास समितीच्या अहवालाबाबत

**(३५) ४८०३३ (०८-०७-२०१९). श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अनुसूचित जमातीच्या जात पडताळणीकरीता शासनाने पी.व्ही. हरदास समिती गठीत केल्याचे माहे एप्रिल, २०१९ च्या प्रथम सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पी.व्ही. हरदास समितीने तयार केलेल्या अहवालाचे फायदे अनुसूचित जमातीला होणार आहेत काय,
(३) असल्यास, पी.व्ही. हरदास समितीच्या तज्ञ सदस्यांनी दिलेल्या अहवालानुसार झालेल्या शिफारसींवर शासन कायद्यात बदल करणार आहे काय, तसेच कायद्यात बदल करण्यास किती कालावधी लागणार आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अशोक उईके (२०-०८-२०१९) :** (१), (२), (३) व (४) अनुसूचित जाती, जमातीच्या लोकांना जात प्रमाणपत्राची वैधता मिळविण्यासाठी येत असलेल्या अडचणींचा विचार करुन त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी दिनांक १४ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये सेवानिवृत्त न्यायमुर्ती श्री. पी.व्ही. हरदास यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दिनांक २९ मे, २०१९ रोजी त्यांचा अंतिम अहवाल शासनास सादर केलेला आहे. सदर अहवालाची छाननी करुन अहवाल शासनाच्या विचारार्थ सादर करण्यात आला आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे-मुंबई जुन्या महामार्गावरील उड्डाण पूल बांधण्याबाबत

**(३६) ४८०९९ (०५-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे-मुंबई जुन्या महामार्गावरील वाहतूक कोंडी होणाऱ्या नऊ मुख्य ठिकाणी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत उड्डाण पूल बांधण्यात येणार असून त्याबाबतचा प्रस्ताव माहे नोव्हेंबर, २०१८ च्या पहिल्या आठवड्यात भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणाकडे मंजूरीसाठी पाठविण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रस्तावाचे स्वरुप काय आहे व यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व सदर निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उक्त प्रस्तावास भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणाची मान्यता प्राप्त झाली आहे काय, असल्यास, केव्हा,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पुणे-मुंबई जुन्या महामार्गावरील उड्डाण पूल बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१९-०९-२०१९) :** (१) होय, जुलै, २०१८ मध्ये प्रस्ताव पाठविण्यात आला आहे.

(२) मुख्यत: सदर कामे संगमस्थान सुधारणा, उड्डाणपूल व सेवा रस्ते तयार करणे याबाबतची आहेत. सदर कामाची अंदाजित किंमत एकूण रुपये ३९०.०० कोटी इतकी आहे.

केंद्र सरकार भूपृष्ठ परिवहन मंत्रालयाच्या वार्षिक आराखड्यात समाविष्ट करण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

(३) नाही.

(४) वरीलप्रमाणे प्रस्ताव सादर.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रोहा, म्हसळा, श्रीवर्धन व अलिबाग (जि.रायगड) तालुक्यात तिसरी मुंबई विकसित करण्याबाबत

**(३७) ४८१२१ (१२-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पनवेलपासून १०० किलोमीटर लांब माणगावमधील कुंडलिका नदीच्या तीरावर रायगड जिल्हयातील रोहा, म्हसळा, श्रीवर्धन आणि अलिबाग या चार तालुक्यातील ४० गावांमधील १९ हजार हेक्टर क्षेत्रफळावर तिसरी मुंबई निर्माण करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सिडकोच्यावतीने नजिकच्या काळात जमीन संपादन प्रक्रिया सुरु केली जाणार असून सिडकोने यासाठी एक अतिरिक्त सहव्यवस्थापकीय संचालक व महसूल विभागातील काही उच्च अधिकारी/ कर्मचारी यांची शासनाकडे मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, तिसरी मुंबई निर्माण करण्यासंदर्भातील निर्णयाचे व प्रकल्पाचे स्वरुप काय आहे, यासाठी किती निधीची आवश्यकता असून निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे तसेच सदर प्रकल्पामुळे साधारणत: किती लोक प्रकल्पबाधित होणार आहेत व त्यांचे पुनर्वसन कशाप्रकारे करण्यात येणार आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन तिसरी मुंबई विकसित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०९-२०१९) :** (१) महाराष्ट्र शासनाने अधिसुचना क्र.टिपीएस-२१९/१५०/प्र.क्र.७/१९/नवि-१२, दि.१९/०१/२०१९ अन्वये रायगड जिल्ह्यातील अलिबाग, मुरुड, रोहा, श्रीवर्धन या ४ तालुक्यातील ४० गावातील १३४०९.५२४० हे.आर क्षेत्रासाठी सिडको महामंडळाची एकात्मिक औद्योगिक वसाहती प्रकल्पासाठी नवनगरविकास प्राधिकरण म्हणुन नेमणूक केली आहे.
(२) होय.
(३) जिल्हाधिकारी, रायगड यांच्या कार्यालयाकडून संबंधित भूमी अभिलेख मागविण्यात येत आहेत. तसेच अधिसुचित क्षेत्राच्या सर्व्हेक्षणाकरीता सिडको महामंडळाच्या संचालक मंडळाने रुपये १४ कोटी आर्थिक तरतूद केली असून एजेंसीची नेमणूक करण्यात येत आहे. प्रकल्पाचे स्वरुप, प्रकल्पाबाधित लोकांची संख्या व पुनर्वसन याबाबत सर्व्हेक्षण करण्यात येत आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रत्नागिरी जिल्ह्यातील जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पाबाबत

**(३८) ४८१७१ (०६-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रत्नागिरी जिल्ह्यातील जैतापूर येथे उभारावयाच्या अणुऊर्जा प्रकल्पासाठी आवश्यक भूसंपादनाचे काम माहे नोव्हेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान पूर्ण झालेले असून हा अणुऊर्जा प्रकल्प पूर्ण क्षमतेने कार्यान्वित झाल्यास जगातील सर्वात मोठा अणुऊर्जा प्रकल्प ठरणार असून त्यातून ९९०० मेगावॅट वीज निर्मिती शक्य होणार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकल्पाच्या कामास सुरुवात करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे व प्रकल्पाचे काम किती कालावधीत पूर्ण होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (३०-०८-२०१९) :** (१), (२), (३) व (४) सदर प्रकल्प हा केंद्र शासनाच्या अखत्यारीतील असून राज्य शासनाची या प्रकल्पास सहाय्यकारी भूमिका आहे. न्यूक्लियर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लिमिटेड या भारत सरकारच्या उपक्रमाकडून प्राप्त झालेल्या माहितीनुसार सदर प्रकल्पात फ्रान्स सरकारच्या सहकार्याने १६५० मे. वॅ. क्षमतेच्या सहा अणुभट्टयांच्या सहाय्याने एकूण ९९०० मे. वॅ. वीज निर्मिती करण्यात येणार आहे. सदर प्रकल्पासंदर्भात न्यूक्लियर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लिमिटेड आणि मे. ईडीएफ, फ्रान्स यांच्यामध्ये चर्चा सुरु आहे.

---

## राज्यभरातील विविध महाविद्यालये व विद्यापीठांमधील प्राध्यापकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३९) ४८२४९ (०५-०७-२०१९). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.अनिल भोसले, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यभरातील विविध महाविद्यालये व विद्यापीठांमध्ये प्राध्यापकांची सुमारे ९५०० पदे रिक्त असून त्याचा परिणाम विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर होत असल्याने सदरहू पदे भरण्याचे आदेश शासनाने दिनांक १० मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निर्गमित केले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आतापर्यंत शासनाने किती प्राध्यापकांची पदे भरली आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू प्राध्यापकांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच पदे भरण्यासंदर्भातील सद्य:स्थिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-०९-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक आढावा-१५१३/प्र.क्र.१२५/मशि-५, दि.०३/११/२०१८ अन्वये राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांतील सहाय्यक प्राध्यापकांची ३५८० पदे भरण्यास मंजूरी देण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

तसेच विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर परिणाम होऊ नये म्हणून महाविद्यालयांत तासिका तत्वावर सहाय्यक प्राध्यापकांची नियुक्ती करण्यात येते.

राज्यातील अकृषी विद्यापीठामधील एकूण ११६६ रिक्त पदांपैकी ६५९ पदे भरण्यास शासन निर्णय दि.०७/०८/२०१९ अन्वये मंजूरी दिलेली आहे.

(२) अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमध्ये ११४७ पदांच्या भरतीसाठी ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात आले असून पदभरतीची कार्यवाही सुरु आहे.

विद्यापीठातील पदभरतीची कार्यवाही विद्यापीठस्तरावर सुरु आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांना ना-हरकत प्रमाणपत्राच्या मागणीसाठी ऑनलाईन पोर्टल उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे. त्यानुसार उर्वरित महाविद्यालयांना त्यांच्या मागणीनुसार ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात येत आहेत.

राज्यातील अकृषी विद्यापीठांमधील एकूण ११६६ रिक्त पदांपैकी ६५९ पदे भरण्याबाबत शासनाच्या दिनांक ७/०८/२०१९ अन्वये मंजूरी दिलेली असून पदभरतीची कार्यवाही विद्यापीठ स्तरावर सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पर्यावरणाचे संतुलन राखण्याबाबत

**(४०) ४८२५१ (०५-०७-२०१९). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.अनिकेत तटकरे, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पर्यावरणाचे संतुलन राखण्यासाठी राज्याच्या एकूण क्षेत्रफळापैकी ३३ टक्के क्षेत्र हे वनाखाली असणे आवश्यक असून राज्यात फक्त १९.९ टक्केच

क्षेत्र वनाखाली असल्याने गेल्या १० वर्षात त्यामध्ये ९३९ चौरस की.मी. ची घट झाली आहे, त्यामुळे वनक्षेत्र ३६९ हजार ४३१ चौरसमीटरवरून ६१ हजार ३६९ चौरस मीटरवर आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, झाडे लावा झाडे जगवाचा नारा दिला जात असताना तो प्रत्यक्षात आचरणात आणला जात नसल्याचे निदर्शनास आलेल्या माहितीनुसार राज्यात मागील ३ वर्षात ६३३ चौ.की.मी. वनक्षेत्र कमी झाले आहे. त्यामुळे ही स्थिती पर्यावरणासाठी धोकादायक असल्याचा इशारा पर्यावरण तज्ञांनी दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यातील वन क्षेत्राचे दिवसेंदिवस घटत जाणारे क्षेत्र दरवर्षी १ जुलै रोजी कोटी कोटीच्या संख्येने लावण्यात येणारी रोपे मोठ्या प्रमाणावर मरत असल्यामुळे, ही परिस्थिती विनाविलंब बदलण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१६-०९-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

राष्ट्रीय वन निती, १९८८ नुसार राज्यात ३३ टक्के क्षेत्र हे वनाखाली असणे आवश्यक आहे. तथापि, सन २००८-०९ मध्ये ६१९३९.०० चौ.कि.मी. एवढे असणारे राज्यातील वनक्षेत्र २०१७-१८ मध्ये ६१८५०.८० चौ.कि.मी. एवढे झाले आहे.

मागील १० वर्षात ८८.२० चौ.कि.मी. वनक्षेत्र कमी झाले आहे. तरी, वन क्षेत्र जवळपास २०.१० टक्के एवढे कायम आहे.
(२) हे खरे नाही.

वार्षिक प्रशासन अहवालानुसार सन २०१५-१६ मध्ये ६१६२२.४३ चौ.कि.मी. असणारे वनक्षेत्र सन २०१७-१८ मध्ये ६१८५०.८० झाले आहे. म्हणजेच राज्यात मागील तीन वर्षात वन क्षेत्रात घट न होता उलट २२८.३७ चौ.कि.मी. एवढी वाढ झालेली आहे.

तसेच भारतीय वन सर्व्हेक्षण संस्था यांनी प्रकाशित केलेल्या सन २०१३ ते २०१७ या कालावधीतील अहवालानुसार राज्यातील वनक्षेत्रात २२२ चौ.कि.मी. ची वाढ झाल्याचे दिसून येत आहे.

(३) वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत वृक्ष लागवड झाल्यानंतर मरत असलेल्या वृक्षांचे संरक्षण व संवर्धन करण्याच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे उपाय योजना केली आहे :-

(अ) वृक्ष लागवडीसाठी उत्तम वाढ झालेली, दर्जेदार आणि गुणवत्तापूर्ण रोपे वापरण्यासाठी सर्व संबंधितांना अवगत करण्यात आले आहे.

(ब) लोकांना वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी आवाहन करुन त्यांना वैयक्तिकरित्या आणि संस्थामार्फत जेथे योग्य जागा उपलब्ध आहेत, त्या ठिकणी वृक्षारोपण करण्यासाठी आणि लावलेली झाडे जगविण्यासाठी जन जागृती करण्यात आली आहे.

(क) वृक्ष लागवडीनंतर रोपांचे जनावरे व इतर बाबींपासून संरक्षण होण्यासाठी योग्य ट्री गार्ड ची व्यवस्था करण्यात आली आहे. तसेच लागवडीनंतर रोपांसाठी पाण्याची व्यवस्था करुन त्यांचे जिवंत राहण्याचे प्रमाण किमान ८० ते ९० टक्के राहण्यासाठी उपाययोजना करण्यात आली आहे.

(ड) वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत लागवड केलेली जी रोपे काही कारणास्त्व जगू शकली नाहीत त्या ठिकाणी वृक्ष लागवड कार्यक्रमांतर्गत पुन:रोपण करुन हिरवाई वाढविण्यासाठी प्रयत्न करण्यात येत आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे शहरात शालेय वाहनांमुळे रस्त्यावर होणाऱ्या वाहतूक कोंडीबाबत

**(४१) ४८३२५ (०५-०७-२०१९). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे शहरात शाळा भरण्याच्या व सुटण्याच्या वेळेत शाळेबाहेरील रस्त्यांवर शाळेतील मुलांसाठी ने-आण करण्यासाठी असणाऱ्या शालेय

वाहनांमुळे रस्त्यांवर वाहतूक कोंडी होत असल्याचे दिनांक २० मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शालेय वाहने ही अनधिकृतरित्या रस्त्यावर उभी करत असल्याने या वाहनांमुळे इतर वाहनांची कोंडी होत असून अपघाताच्या प्रमाणात वाढ झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने वाहतूक कोंडी सोडविण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१६-०९-२०१९) :** (१) अशा आशयाची बातमी दि.२०/०३/२०१९ रोजी वर्तमानपत्रात प्रसिध्द झालेली आहे.
(२) व (३) महाराष्ट्र स्कुल बस (विनियम) नियम २०११ मधील नियम ६ नुसार शाळेच्या वेळा व विद्यार्थ्यांची सुरक्षितता लक्षात घेवून वाहनतळ व वाहन थांबे विनिर्दिष्ट करण्यासाठी प्रादेशिक परिवहन कार्यालय, ठाणे कार्यालयामार्फत कार्यक्षेत्रातील परिसराचे सर्वेक्षण करून ३५ स्कुलबस थांबे स्थापित करण्यासाठी जागा निश्चित करण्यात आली असून तसे वाहतूक पोलिस व ठाणे महानगरपालिका यांना कार्यवाही करण्याकरीता कळविले आहे.

प्रादेशिक परिवहन कार्यालय, ठाणे या कार्यालयाच्या वायुवेग पथकामार्फत शैक्षणिक वर्ष २०१८ ते माहे मे, २०१९ या कालावधीत केलेल्या कारवाईत ४१३३ वाहने तपासण्यात आलेली असून ९५६ वाहने दोषी आढळून आलेली आहे. त्यापैकी २०५ वाहनांचे परवाने निलंबित करण्यात आलेले आहेत. सदर कारवाईतून रुपये २१,८७,०६०/- इतका दंड वसूल करण्यात आलेला आहे.

तसेच सन २०१८ ते माहे जून, २०१९ या दरम्यान ठाणे शहर पोलिस वाहतूक शाखेकडून शालेय विद्यार्थ्यांची सुरक्षितता लक्षात घेवून शाळेच्या विद्यार्थ्यांची अवैधरित्या वाहतूक करणाऱ्या ४५२८ वाहनांवर कारवाई करण्यात येवून दोषी वाहन धारकांकडून रुपये ८,६६,१००/- एवढा दंड वसुल करण्यात आलेला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## समुद्राच्या उधाणामुळे शेतकऱ्यांच्या शेतजमिनीचे व पिकांचे नुकसान झाल्याबाबत

**(४२) ४८३९० (०५-०७-२०१९). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **खारभूमी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) समुद्राच्या उधाणामुळे शेतजमिनीचे व पिकांचे नुकसान झाल्यास शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याची तसेच उधाणाचे पाणी शेतात येऊ नये यासाठी प्रतिबंधात्मक बंधारे बांधण्यासाठी १०० कोटी रुपयांची तरतूद करण्यात आल्याची घोषणा मा.खारभूमी विकास मंत्री यांनी दिनांक ६ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या योजनेचे थोडक्यात स्वरुप काय आहे व ही योजना प्रत्यक्षात केव्हापासून अंमलात येणार आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (३१-०८-२०१९) :** (१) दिनांक ०५/०३/२०१९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील विषय क्र. २१ मध्ये "समुद्रातील उधान या स्थानिक नैसर्गिक आपत्तीमुळे शेती पिकांचे व शेत जमिनीचे नुकसान झाल्यामुळे बाधित होणाऱ्या शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत" या विषयावरील महसूल व वन विभागाने सादर केलेल्या प्रस्तावावर मंत्रिमंडळाचा निर्णय खालीलप्रमाणे आहे.

"खारभूमी विकास योजनेंतर्गत खारभूमी बंधारे पूर्ण झाले तर समुद्राच्या उधाणामुळे शेती पिकांचे नुकसान होणार नाही व वारंवार नुकसान भरपाई देण्याची गरज भासणार नाही. शिवाय शेतीसाठी पुन:प्रापित क्षेत्र देखील वाढेल. त्यामुळे खारभूमी बंधारे कार्यक्रमासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षी मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमध्ये रुपये १००.०० कोटी इतक्या रक्कमेची वाढ जून, २०१९ मध्ये विभागास पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात यावी. जलसंपदा (खारभूमी) विभागाने या उपलब्ध होणाऱ्या वाढीव तरतूदीच्या अनुषंगाने घ्यावयाच्या कामाचे नियोजन करावे व अंमलबजावणी करावी. "

(२) खारभूमी विकास योजनेंतर्गत खारभूमी बंधारे बांधणे, खारभूमी योजनेचे नुतनीकरण, देखभाल, दुरुस्तीची कामे हाती घेणे इत्यादी कामे पूर्ण करुन समुद्राच्या पाण्यामुळे शेती पिकांचे नुकसान होवू नये यासाठी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षामध्ये भरीव तरतूद करण्यात आली असून वरीलप्रमाणे कामे सुरु करण्याचे नियोजन आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गोंदिया जिल्हयात धान खरेदी केंद्राच्या माध्यमातून खरेदी केलेल्या धानाची भरडाई न झाल्याबाबत

**(४३) ४८४३५ (०५-०७-२०१९). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गोंदिया जिल्हयातील जिल्हा मार्केटिंग फेडरेशन व आदिवासी विकास महामंडळ यांच्या अंतर्गत शासकीय धान खरेदी केंद्राच्या माध्यमातून खरेदी केलेल्या धानाची भरडाई राईसमिल व संचालक यांच्यात करार न झाल्यामुळे सुमारे साडेचार लाख क्विंटल धान केंद्रात पडून असल्याचे दिनांक ९ डिसेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन धान खरेदी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१९-०८-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

आदिवासी विकास महामंडळाकडून प्राप्त माहितीनुसार गोंदिया जिल्हयात आधारभूत किंमत खरेदी योजना क्षेत्रात मा.जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्याकडील आदेशान्वये ४३ मंजूर खरेदी केंद्रावर दिनांक ०९/१२/२०१८ अखेर २,३९,२७९.४५ क्विं. धानाची रुपये ४१,८७,३९,०३७.५० ची खरेदी झाली आहे. खरेदी झालेल्या धानाच्या भरडाईसाठी आदिवासी विकास महामंडळाकडून दिनांक १०/१२/२०१८ रोजी १५१ राईस मिलर्स व मार्केटिंग फेडरेशनकडून १६२

मिलर्स निश्चित करण्यात आले असून राईस मिल धारकांशी त्रिपक्षीय भात खरेदीचा करारनामा करुन भात भरडाई सुरु करण्यात आली आहे. सद्य:स्थितीत गोंदिया जिल्ह्यातील ४१,९२,१९४.७९ क्विंटल धानाची खरेदी झाली असून त्यापैकी ३७,०३,९१४.८५ क्विंटल धानाची भरडाई पूर्ण झाली आहे.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बनपूरी (ता.पाटण, जि.सातारा) येथील शेतकऱ्यांना कृषीपंपाची वीज जोडणी मिळणेबाबत

**(४४) ४८४४८ (०६-०७-२०१९). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बनपूरी (ता.पाटण, जि.सातारा) येथील श्री.जयसिंग गणपती पाटील व इतर काही शेतकरी यांनी कृषीपंपाची विद्युत जोडणी मिळणेबाबत मा.ऊर्जा मंत्री यांना दिनांक २५ फेब्रुवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास विनंती अर्ज केला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यांना आर्थिक कारणामुळे स्वंतत्र डी.पी. उभारणे परवडणारे नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणातील अर्जदारांना शेतीपंप वीज जोडणीचे पैसे भरुन घेवून त्वरीत वीज जोडणी देणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (११-०९-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) शासन निर्णय दिनांक १५/११/२०१८ व दिनांक १/०१/२०१९ नुसार राज्यातील शेतीपंप ग्राहकांकरीता मुख्यमंत्री सौर कृषीपंप योजना जाहिर

केलेली आहे. त्यानुसार श्री.जयसिंग गणपती पाटील, रा.बनपुरी, ता.कराड, जि.सातारा यांचा विहिरीवरील शेतीपंपासाठीचा अर्ज कराड विभागीय कार्यालयास माहे फेब्रुवारी, २०१९ मध्ये प्राप्त झाला असून त्यांच्या मागणीप्रमाणे त्यांना सदर कनेक्शन महाराष्ट्र शासनाच्या "मुख्यमंत्री सौर कृषीपंप योजना" अंतर्गत घेण्यासाठी सर्व माहिती देवून अवगत करण्यात आले व तद्नंतर त्यांनी विहिरीवर ५ अश्वशक्ती शेतीपंप वीज जोडणीकरीता दिनांक १६/०३/२०१९ रोजी "मुख्यमंत्री सौर कृषीपंप योजना" अंतर्गत केलेल्या अर्जास मंजूरी देण्यात आली असून त्याकरीता लाभार्थ्यांचे अंशदान प्राप्त झाल्यावर पुढील कार्यवाही नियोजित आहे. सदर अर्ज या योजनेमध्ये समाविष्ठ करण्यात आला असून त्यास दिनांक २९/०५/२०१९ रोजी मंजूरी देण्यात आलेली आहे व त्याचा Beneficiary No. ५२७४२६४१०११९९२८ असा आहे. त्यानुसार श्री.जयसिंग गणपती पाटील यांना ५ अश्वशक्ती DC Solar Pump करीता रुपये २४,७१०/- रक्कमेचे कोटेशन देण्यात आले असून ग्राहकाने सदर कोटेशनची रक्कम भरल्यानंतर नियमानुसार वीज जोडणी देण्याचे काम करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील साखर कारखान्यांनी कमी दराने साखर विक्री केल्याबाबत

**(४५) ४८५८४ (०६-०७-२०१९). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील १६ साखर कारखान्यांनी कमी दराने साखर विक्री केल्याची तक्रार साखर आयुक्तांकडे आल्याची बाब माहे मार्च, २०१९ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील किती व कोणत्या साखर कारखान्यांनी कमी दरात साखरेची विक्री केली आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-०९-२०१९) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

केंद्र शासनाच्या अन्न व सार्वजनिक वितरण मंत्रालयाच्या चिफ डायरेक्टर (शुगर) यांनी दिनांक १३/०३/२०१९ च्या पत्राने मे.जयवंत शुगर्स कराड जि.सातारा या खाजगी साखर कारखान्याने कमी दरात साखर विक्री केलेबाबत कळविले आहे. तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि. मुंबई यांनी दि. १५/०३/२०१९ च्या पत्राने कळविले की, केंद्र शासनाने साखरेचा किमान विक्री दर रुपये ३१००/- प्रती क्विंटल केलेला आहे, परंतु काही साखर कारखाने कमी दराने विक्री करत आहेत.

(३) केंद्र शासनाच्या पत्राच्या अनुषंगाने प्रादेशिक सहसंचालक (साखर) पुणे विभाग यांनी चौकशी केली असता मे.जयवंत शुगर्स यांनी दिनांक १५/१०/२०१८ रोजी २०१६-१७ च्या हंगामातील एम ३० ग्रेडची १०१ क्विंटल साखर रुपये २७२०/- प्रती क्विंटल आणि एस ३० ग्रेडची साखर १३२ क्विंटल रुपये २७२०/- प्रती क्विंटल दराने विक्री केलेली असून सदर साखर केंद्र शासनाच्या दिनांक ७/६/२०१८ रोजीच्या नोटीफीकेशन प्रमाणे रुपये २९००/- प्रती क्विंटल किमान दरापेक्षा कमी दराने विक्री केली असल्याचे निदर्शनास आले आहे. सदर साखर जुन्या साखर साठ्यातील (२०१५-१६ साखर हंगाम) असून ओली झालेली व गुणप्रत कमी असलेली होती असा खुलासा मे.जयवंत शुगर्स या कारखान्याने केला आहे. सदर खुलासा मान्य नसल्याने कारखान्यावर योग्य ती कारवाई करण्यात यावी, असे साखर आयुक्तालयाने चिफ डायरेक्टर शुगर, नवी दिल्ली यांना दि.०६/८/२०१९ च्या पत्रान्वये कळविले आहे.

साखर संघाने केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने साखर आयुक्तालयाने १६६ साखर कारखान्यांचा मार्च, २०१९ मधील साखर विक्रीचा आढावा घेतला असता आढाव्यामध्ये कोणत्याही साखर कारखान्याने रुपये ३१००/- प्रती क्विंटलपेक्षा कमी दराने साखर विकल्याचे आढळून आलेले नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोळी समाजाला जमातीचे प्रमाणपत्र वेळेत मिळण्याबाबत

**(४६) ४८६३१ (०६-०७-२०१९). श्री.रमेशदादा पाटील, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बुलढाणा येथील कोळी समाजातील माधव वाघ या व्यक्तीने कोळी समाजाचे जमातीचे दाखले (प्रमाणपत्र) मिळण्यास विलंब होत असल्याने व शासकीय अधिकाऱ्यांच्या दुर्लक्षामुळे त्रस्त होऊन गळफास घेऊन आत्महत्या केल्याचे माहे मार्च, २०१९ च्या प्रथम सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, समाजाच्या विषयावर अपघात झाल्यास इतर समाजाच्या व्यक्तींना शासनाकडून रुपये ५ ते १० लाख आर्थिक मदत दिली जाते, त्याचप्रमाणे माधव वाघ यांना शासनाने आर्थिक मदत केली आहे काय व किती,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार संबधितांवर काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अशोक उईके (०९-०८-२०१९) :** (१), (२) व (३) मौजे भानखेड, ता.चिखली, जि.बुलढाणा येथील माधव एकनाथ वाघ यांनी दिनांक ११ ऑगस्ट, २०१८ रोजी गळफास घेवून आत्महत्या केलेली आहे. जिल्हादंडाधिकारी, बुलढाणा यांच्या अहवालानुसार त्यांच्या कार्यालयाकडे श्री.वाघ यांचा कोणताही जातीचा दाखल्याबाबतचा अर्ज प्रलंबित नव्हता.

शासनाने राज्यामध्ये “महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग जातीचे प्रमाणपत्र (देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम २००० व त्याअंतर्गत “महाराष्ट्र अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र (देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन) नियम २००३ लागू केलेले आहेत. नियम २००३ मधील नियम ३(३) व ३(४) नुसार कागदपत्रे सादर करणाऱ्या

उमेदवारास अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र मिळते. तसेच उक्त अधिनियमातील कलम ८ नुसार अनुसूचित जमातीचे फायदे घेणाऱ्या अर्जदाराने ज्या जमातीचा किंवा वर्गाचा आहे हे सिध्द करण्याचे जबाबदारी असा दावा करणाऱ्या अर्जदारावर आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई महानगरपालिकेतील अधिकारी व कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(४७) ४८६३९ (१२-०७-२०१९). श्री.रमेशदादा पाटील, श्री.निलय नाईक, श्री.प्रविण दरेकर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबई महानगरपालिकेतील अधिकारी व कर्मचाऱ्यांची अनेक पदे रिक्त असून तेथे नव्याने पद भरती न करता पात्र नसलेल्या कर्मचाऱ्यांना बढती दिली जात असल्याची वस्तुस्थिती माहे मे, २०१९ च्या प्रथम सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सद्य:स्थितीत महापालिकेत किती पदे रिक्त आहेत, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार नव्याने पद भरती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०९-२०१९)** : (१) नवी मुंबई महानगरपालिकेमध्ये नव्याने पदभरती न करता अपात्र कर्मचाऱ्यांना बढती दिली जाते, अशी वस्तुस्थिती नाही.
(२) नवी मुंबई महानगरपालिकेमध्ये सद्य:स्थितीत १७२१ पदे रिक्त आहेत.
नवी मुंबई महानगरपालिकेतील विभागांकरीता विविध संवर्गातील पदे निर्माण करण्यास व महानगरपालिकेच्या आकृतिबंधास दि.२१/०८/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

त्याअनुषंगाने वर्ग-३ व ४ च्या बिंदूनामावली नोंदवहया सहाय्यक आयुक्त, मागासवर्ग कक्ष, कोकण भवन यांनी तपासून व प्रमाणित करून दिलेल्या आहेत.

रिक्त पदे भरण्याबाबत कार्यवाही करण्यात येत असून, सद्य:स्थितीत आरोग्य विभागामार्फत निवड यादीमधील एकूण १२१ उमेदवारांना नियुक्ती आदेश देण्यात आलेले आहेत.

अग्निशमन विभागाच्या लेखी व शारिरीक चाचणी परीक्षा घेण्याची कार्यवाही पूर्ण झाली असून निवड यादी प्रसिध्द करण्यात आलेली आहे. त्यानुसार नियुक्ती देण्याची कार्यवाही महानगरपालिकास्तरावर सुरू आहे.

आरोग्य विभागातील गट-अ व ग-ब संवर्गातील बिंदूनामावली नोंदवहया सामान्य प्रशासन विभागाकडून तपासून घेण्यात आलेल्या असून, त्यानुसार दिनांक ३०/०८/२०१९ रोजी नवी मुंबई महानगरपालिकेस कळविण्यात आले आहे.

उर्वरित रिक्त पदे भरण्याची कार्यवाही नवी मुंबई महानगरपालिकेमार्फत करण्यात येणार आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई विद्यापीठाशी संलग्न असलेल्या अनेक महाविद्यालयांमध्ये प्राचार्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(४८) ४८६७७ (०५-०७-२०१९). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई विद्यापीठाशी संलग्न असलेल्या ६० टक्क्यांहून अधिक प्राचार्यांची पदे रिक्त असल्याचे माहे मे, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रभारी पध्दतीने केलेली नियुक्ती ६ महिन्यापेक्षा जास्त असू नये याबाबत शासनाचे आदेश असतानाही सदर पदास तात्पुरत्या स्वरुपाची मान्यता वर्षानुवर्षे दिली जात असल्याचे समजते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रिक्त पदे त्वरित भरुन शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-०९-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) अंशत: खरे आहे.

शासनाच्या दिनांक १३/१०/२०११ व दिनांक १५/०३/२०१२ शासन निर्णयान्वये एक वर्षापेक्षा अधिक नाही इतक्या कालावधीसाठी प्रभारी प्राचार्य पदाचा कार्यभार देण्यात यावा, अशी तरतूद आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाच्या अधिसूचनेमध्ये प्राचार्यांचे पद केवळ ५ वर्षाच्या कार्यकाळाकरीता निश्चित करण्यात आलेले असल्यामुळे विहित मार्गाने नियुक्तीसाठी योग्य उमेदवार उपलब्ध होत नाहीत. प्राचार्य हे प्रशासकीय पद असून योग्य उमेदवार उपलब्ध न झाल्यास महाविद्यालयाचे दैनंदिन कामकाज सुरळीतपणे सुरु राहण्यासाठी नियमित प्राचार्य नियुक्त होईपर्यंत महाविद्यालयातील ज्येष्ठतम प्राध्यापकांची विद्यापीठामार्फत तात्पुरत्या स्वरुपात प्रभारी प्राचार्य म्हणून नियुक्ती केली जाते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

शासनाचे परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७०/मशि-५, दिनांक २३/०४/२०१८ अन्वये प्राचार्य पदाच्या भरतीवरील बंदी उठविण्यात आली असून पदभरतीची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे हुर्डी, पो.वडवळी (ता.माणगांव, जि.रायगड) गावातील विहिरीपासून हुर्डी फाटयापर्यंत स्ट्रीट लाईटसाठी विजेचे खांब मंजूर करणेबाबत

**(४९) ४८८४० (०६-०७-२०१९). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे हुर्डी, पो.वडवळी (ता.माणगांव, जि.रायगड) गावातील विहिरीपासून हुर्डी फाटयापर्यंत स्ट्रीट लाईटसाठी विजेचे खांब मंजूर करणेबाबत लोकप्रतिनिधींनी मा.ऊर्जा मंत्री यांना दिनांक ८ फेब्रुवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या निवेदनानुसार शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०६-०९-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) सदर स्ट्रीट लाईटबाबतचे तांत्रिक अंदाजपत्रक गोरेगाव विभागीय कार्यालयाने जिल्हा नियोजन व विकास समितीस पाठविण्याचे नियोजित आहे. ग्रामपंचायत वडवळीकडील वीज देयकांच्या प्रलंबित थकबाकीचा भरणा ग्रामपंचायत मार्फत झाल्यानंतर व जिल्हा नियोजन व विकास समिती तर्फे निधी उपलब्ध झाल्यानंतर मौजे हुर्डी येथील विहिरीपासून हुडी फाट्यापर्यंत पथदिव्यांच्या वीज जोडणीचे काम पूर्ण करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजा पौळ डिग्रस (ता.सेलु, जि.परभणी) येथील जमिनीचा ताबा मूळ मालकास देण्याबाबत

**(५०) ४९१५८ (०५-०७-२०१९). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजा पौळ डिग्रस (ता.सेलु, जि.परभणी) या गावातील गट नं. २५४ मध्ये ७ एकर १ गुंठे ९० आर ही शेत जमीन रामेश्वर पौळ यांच्या मालकीची असून सदरील जमीन गावातील काही व्यक्तींनी अवैधरित्या हडप केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने सेकंड अपील नं. ६५०/२००३ मध्ये दिनांक २१/०१/२०१९ रोजी सदरील जमीन रामेश्वर पौळ यांना देणेबाबत आदेश पारित केले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मा.न्यायालयाच्या या आदेशाची दखल घेवून जमिनीचा ताबा सदर व्यक्तीला देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०९-२०१९) :** (१), (२) व (३) मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, श्री.रामेश्वर पौळ हे फेरफार क्रमांक १३१० नुसार, मालकी हक्कात आले आहेत. परंतु गैरअर्जदार यांनी मा.सर्वोच्च न्यायालयात अपील दाखल केले असून, मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.०९/०५/२०१९ च्या आदेशान्वये सदर प्रकरणी "जैसे थे" परिस्थिती ठेवण्याचे आदेश दिले असून सद्य:स्थितीत सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेंद्र भागवत**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.